# नवभारत

फेब्रुवारी २०१३



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई










नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६५ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारत' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

– संपादक मंडळ

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६६। अंक ५। फेब्रुवारी २०१३
पौष-माघ शके १९३४
वार्षिक वर्गणी ३०० रूपये
या अंकाची किंमत रु.२०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका

# नवभारत

## फेब्रुवारी २०१३

## अनुक्रमणिका



अनुक्रमणिका

# यशवंतरावांच्या पुरोगामी नेतृत्वाची जडणघडण

रमेश रामचंद्र चव्हाण

१ मे १९६० रोजी मुंबईसह 'मराठी' भाषिक महाराष्ट्र राज्याची स्थापना झाली. या घटनेला ५२ वर्षे पुरी झाली. या एका ऐतिहासिक टप्प्यावर आपण ज्यांनी संयुक्त महाराष्ट्राचा मंगल कलश आणला व या राज्याची धुरा पहिले मुख्यमंत्री म्हणून सांभाळून सर्वांगीण विकासाची दिशा दिली, त्या कै. यशवंतराव चव्हाण यांचे जन्मशताब्दी वर्ष सर्व स्तरावर साजरे करत आहोत. यानिमित्त त्यांच्या योगदानाचा विविधांगी अभ्यास पुनरपि समोर येत आहे, ही आनंदाची व समाधानाची गोष्ट आहे. कारण नवीन पिढीस त्यांच्या आदर्श विचारसरणीची, आचारांची, कर्तृत्वाची व सुसंस्कृत व्यक्तित्वाची ओळख करून देणे अत्यंत आवश्यक आहे. त्यामुळे अशा तऱ्हेचे परिसंवाद, चर्चासत्र शाळा-महाविद्यालयांमधून अधिकाधिक होणे गरजेचे आहे. केवळ एक कर्तव्य, कृतज्ञता म्हणून स्मृतिवर्ष साजरे न करता, एक आदर्श 'कित्ता' म्हणून त्यांचे विशाल व उत्तुंग व्यक्तिमत्त्व तरुण पिढीपुढे मांडणे अत्यंत गरजेचे आहे. प्राज्ञपाठशाळा-मंडळाचे अध्वर्यू मा. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व यशवंतराव चव्हाण यांचे जिव्हाळ्याचे संबंध पाच दशकांचे होते. एकमेकांनी अनेक भूमिकांतून एकमेकांना साहाय्य, सहकार्य व विचारविमर्ष करून मैत्रीतील आदर, प्रेम, विश्वास व स्नेह यांचा आदर्शच समाजासमोर ठेवला. त्यामुळे प्राज्ञपाठशाळामंडळाने अशा तऱ्हेचा परिसंवाद ठेवून गतस्मृतींना उजाळा देण्याचे काम केले आहे. मी एक वाईकर असल्याने दोघांच्या पवित्र स्मृतीस आदरांजली अर्पून 'यशवंतरावांचे पुरोगामी नेतृत्व' याविषयी माझे अल्पसे आकलन आपल्यापुढे ठेवत आहे.

'आधुनिक महाराष्ट्राचे शिल्पकार' म्हणून यशवंतरावांना संबोधितात; कारण त्यांनी विकासाची दिशा दिली, प्रगतिपथाचे नियोजन केले. या विचारवंत विवेकवंताने आपल्यासाठी काही स्वप्ने पाहिली, त्यांतून विकासाची दृष्टी दिली. शिक्षण, ग्रामीण विकास, सहकारी चळवळ, पंचायत राज्य, साहित्य व संस्कृती, कृषी, औद्योगिक आणि सामाजिक न्याय व समता अशा सर्व क्षेत्रांतील विकासकार्याचा प्रारंभ करून महाराष्ट्राला प्रगत वाटचाल करण्यास मार्गदर्शन केले. स्वतःच्या पुरोगामी दृष्टीची ओळख महाराष्ट्रास देऊन देशामध्ये 'पुरोगामी महाराष्ट्र' ही संकल्पना दृढ केली. परंतु त्यांच्या पुरोगामी नेतृत्वाची जडणघडण त्यापूर्वीच परिपूर्ण अशी त्यांनी स्वावलंबनाने तयार केली होती. वयाच्या ३५-४० व्या वर्षी एवढी वैचारिक परिपक्वता कमावल्यामुळेच त्यांच्या व्यक्तिमत्त्वाने आपली छाप महाराष्ट्रावर व देशपातळीवर उमटवली. यशवंतराव चव्हाण यांनी राष्ट्रकारण, सत्ताकारण वा राजकारण प्रामुख्याने केले, हे खरे; पण त्याचा पाया निकोप समाजकारणाचा होता. १००% राजकारणात राहूनसुद्धा त्यातील राजकारण १०% व समाजकारण ९०% अशीच त्यांची वाटचाल झाली. 'कृष्णाकाठ' या त्यांच्या अत्यंत सुबोध, सुलभ, सोप्या व प्रसन्न भाषेत लिहिलेल्या आत्मचरित्राचे वाचन करीत असताना त्यांच्या भावी पुरोगामी वाटचालीचा पाया त्यांनी कसा घडवला, ह्याचे प्रत्यंतर येतेच; पण प्रत्येक परिस्थितीत, घटनेत सारासारविचार व विवेक करून, सातत्याने जपलेल्या अंगभूत स्वभावात याचे विस्मयकारक दर्शन होते. सदरचे आत्मचरित्र त्यांची जडणघडण समजण्यासाठी पुनरपि वाचत असताना मला खालील मुद्दे सातत्याने स्पर्श करीत होते.

१) यशवंतरावांच्या विद्यार्थिदशेत सातारा जिल्ह्यात सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळ चालू होती. खुद्द त्यांचे बंधूच या चळवळीत एक पुढारी होते. त्यांच्यावर या चळवळीचे संस्कार होत होते. परंतु ते प्रत्यक्ष या चळवळीत पडले नाहीत वा तिचे नेतृत्व केले नाही. पण सत्यशोधक चळवळीचे ध्येय, इंगित त्यांनी आत्मसात केले. 'कृष्णाकाठ'मध्ये यशवंतराव नमूद करतात– "महात्मा फुल्यांचा विचार मूलगामी आहे व तो काही नवीन दिशा

दाखवतो आहे, असे मलाही वाटले. त्यांनी उभे केलेले काही प्रश्न तर निरुत्तर करणारे होते. शेतकरी समाजाची होणारी पिळवणूक, दलित समाजावर होणारा अन्याय आणि शिक्षणापासून वंचित ठेवलेला बहुजनसमाज व स्त्रिया यांचे प्रश्न सोडविल्याखेरीज देशाचे कार्य होणार नाही, हा त्यांच्या विचारांचा सारांश माझ्या मनामध्ये ठसला. त्यांनी (फुल्यांनी) उभे केलेले प्रश्न महत्त्वाचे आहेत; पण त्यासाठी कुठल्यातरी एका जातीचा द्वेष केला पाहिजे.... हे मला पटत नाही. जे समाज मागे पडले आहेत, त्यांना जागृत करणे, त्यांच्यात नवीन धारणा निर्माण करणे हाच उत्तम मार्ग आहे." ('कृष्णाकाठ' पृ. ३४.) ही मूलभूत व विधायक दृष्टी म. फुल्यांच्यात यशवंतरावांनी पाहिली व पुढे सत्ताकारणाची कसोटी समाजकारण ठेवून त्यांनी राजकारणाच्या पटावर पाऊले टाकली.

२) कराडात टिळक हायस्कूलमध्ये यशवंतराव शिकले. टिळकांविषयी त्यांना शेवटपर्यंत पूज्यभाव होता. त्यांना सामाजिक स्वातंत्र्यापेक्षा राजकीय स्वातंत्र्याची चळवळ अगत्याची वाटली. पण ते टिळकसंप्रदायी झाले नाहीत.

३) सत्याग्रही वीर म्हणून स्वराज्यार्थ तिरंगी झेंडा खांद्यावर घेतला, तो अखेरपर्यंत त्यांच्याभोवती राहिला. तुरुंगवास भोगला. काँग्रेसवरील त्यांची श्रद्धा अंतर्गत मतभेदांना वारंवार तोंड देत शेवटपर्यंत अचल राहिली.

४) प्रथम ब्राह्मणेतर पक्षाचे कै. भास्करराव जाधव यांच्या निवडणुकीत काम करूनसुद्धा पुढे यशवंतराव त्यांच्यापासून अलिप्त राहिले. ते इंग्रजधार्जिणे झाले नाहीत.

५) १९३४ पासून राजाराम कॉलेजमध्ये शिक्षण घेण्यासाठी शाहूमहाराजांनी सुरू केलेल्या मराठा बोर्डिंगमध्ये न राहता स्वतंत्र खोली घेऊन राहिले. याचाच अर्थ ते विद्यार्थिदशेपासून जातीय विचाराच्या पलीकडे होते. पण शाहूमहाराजांचे ध्येय त्यांनी आयुष्यभर नजरेआड होऊ दिले नाही.

६) मॅट्रिकचा अभ्यास करताना संस्कृतची शिकवणी लावावी, अशी गरज यशवंतरावांना वाटली. पण संस्कृत शिक्षकाने 'मी अब्राह्मणांना संस्कृत ही देववाणी शिकविणार नाही', असे सांगितल्यामुळे त्यांना सरळ शुद्ध मराठी घ्यावे लागले. असा सामाजिक कटू अनुभव येऊनसुद्धा त्यांनी सर्व ब्राह्मणजातीला दोष दिला नाही वा राग धरला नाही.

७) कराडक्षेत्री व पुढे त्यांचे अनेक सहाध्यायी आर. एस. एस. मध्ये होते. तरी त्यांच्या जीवनावर राष्ट्रीय सभेचे जे व्यापक संस्कार झाले होते, ते एवढे प्रभावी ठरले, की ते आर. एस. एस. पासून चार पावले दूर राहिले. बॅ. सावरकरांची समक्ष गाठ घेऊनसुद्धा ते त्यांच्या हिंदुत्ववादी विचारसणीचे झाले नाहीत. निधर्मी लोकशाहीचे ते प्रवक्ते व पुढारी राहिले.

८) रॉय यांचा क्रांतिकारक सुधारणावाद यशवंतरावांच्या पूर्ण परिचयाचा होता. दुसऱ्या महायुद्धात त्यांना एम. एन. रॉय यांची इंग्रजधार्जिणी भूमिका न पटल्यामुळे ते रॉयवाद्यांपासून दूर राहिले. मैत्री मात्र कायम राखली. जे जे प्रवाह समकालीन होते त्यांचे निरीक्षण, परीक्षण करून स्वावलंबनाने हिंदी स्वातंत्र्याचा गांधी-नेहरू यांच्या लढ्याचाच मार्ग त्यांनी स्वीकारला. नवमानवतावाद, समाजवाद यांची रहस्ये आत्मसात करून त्याचा व्यवहारी अर्थ त्यांनी जाणला.

९) ना. खेर यांच्या प्रतिगामी धोरणामुळे महाराष्ट्रात शेतकरी कामकरी पक्षाने जन्म घेतला. व्यापक राष्ट्रीय दृष्टिकोन स्वीकारलेल्या यशवंतरावांनी त्यात न जाता उलट खेर यांच्यामुळे दुभंगलेला महाराष्ट्र एकत्र करण्याचा यशस्वी प्रयत्न केला.

१०) यशवंतरावांच्यावर त्यांच्या आईचे देवधर्मविषयक संस्कार दृढ राहिले. 'मीपणा सोड आणि जे तुझे काम तू केले पाहिजेस, ते तू करीत रहा', हे 'गीतासार' त्यांच्या आईने त्यांना सांगितले. त्यांच्या धर्मभावना, धर्मसंकल्पना या नियामक मंडळाचे स्वरूप धारण करत नाहीत. आंतरिक समाधान व मानवमात्राचा विकास हाच भावार्थ राहिला.

११) प्रौढ शिक्षण प्रसाराची शाळा हरिजनांसाठी काढून त्याचे उद्घाटन महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या हस्ते केले. त्यांच्यापासून अस्पृश्यतानिवारणाचे धडे घेऊन ब्राह्मणेतरवाद, मराठेतरवाद यांपासून स्वतःस दूर ठेवून त्यांची बहुजनवादाची शिकवण आत्मसात केली, ज्याची गरज देशपातळीवर अत्यंत आवश्यक होती.










१२) राजर्षी शाहू, लोकमान्य टिळक, म. गांधी व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यामधील मतभेदांचा अभ्यास ते सातत्याने करत होते.

१३) म. गांधी यांच्यामध्ये एकाच वेळेस स्वातंत्र्याची, समाजसुधारणेची, अस्पृश्यतानिवारण्याची प्रेरणा वास करत असल्याने सातत्याने काँग्रेसमध्ये राहून राष्ट्रीय वृत्ती त्यांनी अंगी बाणविली. पुढे नेहरूंचे नेतृत्व मिळाल्याने ते नेहरूनिष्ठ झाले. त्यांचा विश्वास त्यांनी संपादन केला. लोकशाही समाजवादाचे ते प्रवक्ते झाले.

१४) शिवाजीमहाराजांसंबंधी यशवंतरावांना अतोनात आदर होता. शिवाजीने सर्वसामान्य मावळे जमा केले. तसेच यशवंतरावांनी प्रतिष्ठित व सुसंस्थापित लोकांपेक्षा सामान्यांतून अनेक कार्यकर्ते व पुढारी तयार केले. ग्रामीण नेतृत्वाला पुढे आणणे हा त्यांचा एक समाजकारणाचा पैलू होता. बहुजन समाजाला राष्ट्रीय दृष्टी त्यांनी दिली.

१५) सतत अभ्यास, वाचन, चिंतन, मनन व व्यासंग यांमुळे त्यांनी स्वतःची परिपक्वता निरंतर वृद्धिंगत केली.

वरील सर्व मुद्द्यांचा विचार केल्यावर यशवंतरावांनी पुढील पुरागामी नेतृत्वाचा पाया प्रत्यक्ष सत्ताकारणात सत्ता राबविण्याच्या कितीतरी अगोदर रचला होता, हे सहजच ध्यानात येते. धर्मनिरपेक्षता, लोकशाही समाजवाद आणि नियोजन हे त्यांच्या राजकीय नीतीचे आधार राहिले, हे त्यांची पुढील राजकीय वाटचाल दर्शविते.

यशवंतराव चव्हाण जीवनात 'यशवंत' झाले याचे कारण त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे जे अनेक पैलू होते, त्यांचे दर्शन त्यांच्या साहित्यात, भाषणात, राजकीय कार्यात, विरोधकांनी त्यांच्या कार्याच्या केलेल्या मूल्यमापनात प्रतिबिंबित झाले आहे. त्यांचे लेख, भाषणे, साहित्य हे मराठी सारस्वतातील लेणे आहे. यशवंतराव एक साहित्यिक म्हणून श्रेष्ठ आहेत. याबद्दल म्हणावा असा गौरव अद्यापि झालेला नाही. त्यांची ग्रंथसंपदा व साहित्यिकांचा सहवास त्यांच्या व्यासंगाची खोली दर्शवितो. त्यांच्याइतका, सर्व स्तरांतील लोकसंग्रह क्वचितच एखाद्या नेतृत्वाच्या वाट्याला येतो. त्यांच्या जडणघडणीतील खालील पैलू तरुण पिढीने, सामाजिक व राजकीय कार्यकर्त्यांनी नीट समजावून घेतले पाहिजेत; कारण त्यातूनच त्यांनी राष्ट्राला दिलेले पुरोगामी नेतृत्व सिद्ध झालेले आहे.

स्वतंत्र, सावध, चिकित्सक,
चोखंदळ व हशार बुद्धी;
साधकबाधक विचार,
सदसद्विवेकबुद्धी, शुद्ध विचार;
आशावादी दृष्टिकोन,
जिद्दी व कष्टाळू स्वभाव,
वर्धमान वाचन, शिक्षणाची आवड व
लोकसंग्राहक वृत्ती;
मूलभूत व विधायक दृष्टीतून निवडलेली
अखिलभारतीय दृष्टी व राष्ट्रीय वृत्ती, देशभक्ती;
ध्येयावर प्रामाणिक निष्ठा, प्रचंड सहनशक्ती व
सचोटी, संवेदनशीलता;
मृदुता, नम्रता, शिष्टाचार, शांत व गंभीर स्वभाव,
साहित्य, कला व क्रीडा यांचा छंद;
समन्वयवादी वृत्ती, पूर्वग्रह त्यागवृत्ती,
संघर्ष टाळणारा स्वभाव, संयम,
जातिभेदातीत दृष्टी, सर्वधर्मसमभाव, सृजनशीलता;
व्यक्तिस्वातंत्र्यवादी दृष्टी,
इतरांच्या मताचा आदर करण्याची वृत्ती;
सर्वांना बरोबर घेऊन जाण्याची वृत्ती;
अपरिग्रहता, निःस्वार्थ वृत्ती, प्रेमळ स्वभाव;
उत्तम प्रशासकीय गुण, समाजाभिमुख प्रशासन व
नेतृत्व कौशल्य;
संघटनाकौशल्य;
आई विठाबाई व बंधू गणपतराव यांचे संस्कार;
म. फुले, शाहू, वि. रा. शिंदे, डॉ. आंबेडकर
यांची पुरोगामी दृष्टी;
टिळक, गांधी, नेहरू यांच्यावरची निष्ठा,
पक्षशिस्त, पक्षनिष्ठा;
सामान्य माणसाचा विकास हेच ध्येय.

वरील गुणसमुच्चयातून त्यांनी स्वसामर्थ्यावर स्वतःचे व्यक्तिमत्त्व व वैचारिक ठेवण सिद्ध करून, स्वतःला, समाजाला व पक्षाला तात्त्विक नैतिक अधिष्ठान दिले, कार्यकर्त्यांना उदात्त ध्येयवाद दिला. यातूनच सत्तासोपानावरची उत्तुंग शिखरे त्यांनी पादाक्रांत केली.

अनुक्रमणिका

मिळालेली सत्ता विचारपूर्वक लोकहितार्थ वापरण्याची पराकाष्ठा केली. विकासाचे धोरण, प्रगतीचे नियोजन करताना व्यापक समाजकारण हे साध्य-ध्येय नजरेआड होऊ दिले नाही. त्यामुळे महाराष्ट्राची याच पायावर जडणघडण होऊन ते एक प्रगत राज्य, पुरोगामी राज्य म्हणून नावारूपास आले. दूरदृष्टीने त्यांनी आखलेली आर्थिक धोरणे, विकास आराखडा व प्रशासनाची दिशा महाराष्ट्रात युतीसरकारचे काही काळ राज्य येऊनसुद्धा, त्यांना त्यात बदल करावासा वाटला नाही.

आजच्या जागतिकीकरणाच्या कालखंडात आणि बाजारपेठी अर्थकारणाला महत्त्व लाभण्याच्या काळात नियोजन, धोरणे व अंमलबजावणी यांची विविध आव्हाने समोर उभी आहेत. समाजव्यवस्थासुद्धा बदलत आहे. त्यामुळे विकासाची गती राखणे हे महत्त्वाचे आव्हान आहे. त्यामुळे सत्ताकारणातील व्यक्तींना फार मोठी वैचारिक परिपक्वता एकसंधपणे उभी करावी लागणार आहे आणि असे नेतृत्व सर्व पातळ्यांवर निर्माण करण्यासाठी 'यशवंतराव चव्हाण' यांचे चरित्र मार्गदर्शन करणारे आहे.

१९३० ते १९४६ या त्यांच्या आयुष्याच्या पहिल्या टप्प्यात त्यांनी केलेले कार्य केवळ सामाजिक व राष्ट्रीय कार्य होते. उदा., कायदेभंगाच्या चळवळीतील सहभाग (१९३०-३३), समाजवादी पक्षाची स्थापना (१९३५), एम. एन. रॉय यांचा प्रभाव व काम (१९३६-३८), सातारा जिल्हा काँग्रेसचे अध्यक्ष (१९४०), चले जाव व भारत छोडो चळवळीत सहभाग (१९४२), राजकीय स्वातंत्र्याच्या मुद्द्यांवर कारावास (१९४४-४५).

१९४६-१९६२ पर्यंतच्या काळत खूपच कुशलपणे काम करून सर्व घटकांना विश्वासात घेऊन सत्तेच्या तुलनेत समाजकारण जास्त महत्त्वाचे मानून, राजकारणातील धोका पतकरून सामाजिक व आर्थिक निर्णय घेतले व राबविले. उदाहरणार्थ, नवबौद्धांच्या सवलती चालू ठेवल्या, संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती, पंचायत राज्याची स्थापना, ग्रामीण नेतृत्वास वाव, पंचायत राज्यात जिल्हा परिषदेत मागासवर्गीयांना वाव, सहकार,कृषी व उद्योग क्षेत्रांतील निर्णय, महार वतन बिल, कुळकायदा, रुपये ९०० पर्यंत उत्पन्न असणाऱ्यांस शिक्षण फी माफीचा निर्णय, विद्यापीठांची निर्मिती, मराठी साहित्य व संस्कृती मंडळ व विश्वकोशाची निर्मिती.

१९६२ ते १९८४ या त्यांच्या आयुष्यात देशपातळीवर काम करताना केंद्रीय संरक्षणमंत्री, गृहमंत्री, अर्थमंत्री, परराष्ट्रमंत्री, उपपंतप्रधान इत्यादी सत्तासोपानावरील पदे भूषवताना आपल्या स्वतंत्र बाण्याची छाप त्यांनी उमटविली. असे असूनसुद्धा त्यांच्या दिल्लीतील २२ वर्षांच्या प्रचंड कारकिर्दीचे मूल्यांकन म्हणावे असे अद्यापि झालेले नाही. त्यामुळे यशवंतरावांना महाराष्ट्रापुरते मर्यादित ठेवण्यात त्यांच्या पुरोगामी नेतृत्वावर अन्याय करण्यासारखे आहे. अनेक कटू-गोड अनुभव त्यांनी पचविले. काही काळ विजनवास सुद्धा संयमाने सोसला. प्रंतप्रधानपदाची संधी येऊनसुद्धा त्यांची पक्षशिस्त व पक्षनिष्ठा सत्तेच्या तुलनेत जास्त मोठी असल्याने या संधीपासून ते वंचित राहिले. या त्यांच्या प्रवासात त्यांच्या प्रेमळ पत्नी सौ. वेणूताई यांनी मोलाची साथ दिली. यशवंतरावांनी संयमीपणे स्वत:चे चरित्र व चारित्र्य जपून नि:स्वार्थी राहून आपल्यापुढे एक आदर्श निर्माण केला.

एका गरीब, कोरडवाहू शेती असलेल्या ग्रामीण भागातून आलेला निरक्षर शेतकऱ्याचा मुलगा स्वावलंबनाने, स्वकर्तृत्वावर पुढे येऊन आपल्यासमोर उत्तुंग 'आदर्श नेतृत्वाचा' वस्तुपाठ ठेवतो हे पाहून 'झाले बहु। होतील बहु। पण यासम हा।' असेच म्हणावे लागते. त्यांच्या चिवट ध्येयवादापुढे मी नतमस्तक होत आहे.

शेवटी त्यांच्या 'युगांतर' या पुस्तकातील खालील उतारा मार्गदर्शनपर असल्याने आपणापुढे ठेवतो-

"हिंदुस्थानात अजून उघडी नागडीहिंडणारी गरिबी ही जर अशीच हिंडत राहणार असेल, तर या स्वातंत्र्याला आणि आज आपण करीत असलेल्या प्रयत्नांना काहीच अर्थ राहणार नाही. आम्हाला ही गरिबी हटविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. मनाची गुलामगिरी हटविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्या समाजामध्ये प्रत्येक मनुष्य स्वाभिमानाने आपली उंच मान करून निर्भयपणे वावरू शकेल, त्याला पोटभर अन्न आणि अंगभर वस्त्र मिळेल, त्याला आपल्या बुद्धीचा आणि शिलाचा विकास करण्याची संधी मिळेल, अशा प्रकारचा समाज आपल्याला निर्माण करावयाचा आहे." (युगांतर पृ. ५९-६०).

संदर्भ :-


१) 'कृष्णाकाठ', आत्मवृत्त, लेखक यशवंतराव चव्हाण.
२) 'युगांतर', लेखक यशवंतराव चव्हाण.
३) 'भूमिका', लेखक यशवंतराव चव्हाण.
४) 'सह्याद्रीवरील सूर्यास्त', लेखक रामभाऊ जोशी
५) 'शब्दांचे सामर्थ्य', संपादक राम प्रधान.
६) 'यशवंतरावांचे समाजकारण', लेखक रा. ना. चव्हाण, वाई.
७) 'राष्ट्रवादी', मासिक मार्च २०१२, संपादक सुधीर भोंगळे.




---

# यशवंतराव चव्हाण व राष्ट्रपातळीवरील नेतृत्व

श्री. मा. भावे

देशाच्या स्वातंत्र्यचळवळीतील मुख्य प्रवाहाचे नेतृत्व लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्राकडे राहिले नाही, याची मोठी खंत महाराष्ट्रातील लोकमत घडविणाऱ्या वर्गाला व वृत्तपत्रांना लागून राहिली होती. 'जागृती' या वृत्तपत्राचे संपादक श्री. पाळेकर हे ब्राह्मणेतर पक्षाचे नेते होते आणि टिळकांचे कट्टर विरोधक होते. त्यांनी 'जागृती' या वृत्तपत्रात टिळकांवर मृत्युलेख लिहिला. त्यात त्यांनी टिळकांना कोठेही 'लोकमान्य' हे बिरुद लावलेले नाही. असो. पण त्या लेखातही त्यांना अशी काळजी व्यक्त केल्यावाचून राहवले नाही की, टिळकांच्या मृत्यूनंतर देशाचे नेतृत्व महाराष्ट्राकडे राहणार नाही व ही गोष्ट क्लेशकारक होईल.

इंग्रजांनी देशाचे निरनिराळे विभाग जिंकले व १८२० च्या सुमारास त्यांनी, ब्रिटिश पार्लमेंटच्या आदेशानुसार, ठिकठिकाणी शाळा-महाविद्यालये सुरू केली. यातून, ज्याला राजा राममोहन रॉय यांनी 'मध्यमवर्ग' असे नाव दिले होते व युरोपीयन विचारप्रणालीशी ज्याची तोंडओळख झाली होती, असा वर्ग निर्माण झाला. निरनिराळ्या प्रांतांतील पारंपरिक नेतृत्व या वर्गापुढे निष्प्रभ ठरून एका नवीन राजकारणी समाजाची पायाभरणी १८६० पर्यंतच्या काळात झाली. याच वेळी इलबर्टबिलाविषयीचे वादळ उठले आणि या नवीन राजकारणी समाजाला अशी जाणीव झाली, की आपण कितीही सुशिक्षित झालो व सामाजिक दृष्ट्या सुधारलो, तरी ब्रिटिश नोकरशाही आपल्याला समानतेची वागणूक देणार नाही. आपले अधिकार मिळवावयाचे असतील, तर आपण संघटित शक्तीच उभी केली पाहिजे. या उद्देशाने मुख्यतः बंगाल, मुंबई व मद्रास इलाख्यांतील राजकारणी एकत्र आले व त्यांनी १८८५मध्ये काँग्रेसची स्थापना केली. काँग्रेसवर प्रथमपासूनच बंगाली व मराठी गटांचे वर्चस्व होते. न्या. रानडे, काशिनाथ त्र्यंबक तेलंग आणि नंतर लवकरच गोपाळ कृष्ण गोखले ही मराठी माणसे फिरोजशहा मेहता आणि दिनशा वाच्छा अशा प्रभावी व्यक्तींशी संधान साधून काँग्रेसची सूत्रे हलवीत असत. पुढे टिळकांनी त्या वेळच्या तृणमूलस्तरावर काम करून आणि इंग्रजसरकारच्या विरोधात प्रचार करून आपल्या गटाच्या हातात काँग्रेसच्या राजकारणाच्या किल्ल्या राहतील, असा अयशस्वी प्रयत्न १९०७ सालच्या सुरतेतील अधिवेशनात केला. त्यातून काँग्रेस भंगली व टिळकांच्या गटावर दडपशाहीचा वरंवटा फिरला. मंडालेहून सुटून आल्यावर टिळकांनी होमरूलची मोहीम हाती घेतली व १९१६ साली लखनौच्या अधिवेशानात काँग्रेसवर आपला पगडा बसविला. १९१८साली टिळकांना दिल्ली येथे भरणाऱ्या काँग्रेसचे अध्यक्ष निवडण्यात आले. पण ते परदेशी प्रवासाला निघाले असल्याने त्यांनी ते पद घेतले नाही. त्यानंतर आजवर एकही मराठी प्रमुख काँग्रेसच्या अध्यक्षपदावर पोचलेला नाही. कै. मा. श्री. अणे हे १९३३साली काँग्रेसचे एकाधिकारी म्हणून नेमले गेले होते; पण ती अपवादात्मक स्थिती होती. सारांश, पाळेकरांनी जी भीती व्यक्त केली होती, ती टिळकांच्या मृत्यूनंतर लवकरच प्रत्यक्षात आली व आजतागायत मराठी माणूस राष्ट्रीय राजकारणात निर्णायक भूमिका घेण्याच्या ठिकाणी पोचलेला नाही.

स्वातंत्र्यानंतर भाषावार राज्यरचनेचा प्रश्न ऐरणीवर आला व राष्ट्रीय पातळीवर महाराष्ट्राची दारुण उपेक्षा होते आहे, अशी भावना महाराष्ट्रात पसरली. महाराष्ट्र काँग्रेसचे नेते देव, देवगिरीकर, हिरे व गाडगीळ यांचे काँग्रेसच्या राष्ट्रीय नेतृत्वाने कधीच अगत्य राखले नाही. मुंबईचा समावेश महाराष्ट्रात करण्याविषयी त्यांनी नेहमीच काँग्रेस व मोरारजी देसाई यांच्याकडे नकाराधिकार ठेवला. शेवटी विरोधी पक्षीयांनी व मुख्यतः मुंबईतील मराठी जनतेने चवताळून जाऊन जो लढा दिला, त्यामुळे वस्तुस्थितीचे भान राष्ट्रीय नेतृत्वाला आले व त्यांनी केंद्रशासित मुंबईचा आग्रह सोडून द्विभाषिकाचा प्रस्ताव






संसदेत घाईघाईने मंजूर करून घेतला व नंतर साडेतीन वर्षांनी मुंबईसकट संयुक्त महाराष्ट्राची स्थापना केली.

संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीची धामधूम चालली असताना महाराष्ट्राला जी सापत्नभावाची वागणूक मिळत असे, त्यासंबंधीच्या अनके गोष्टी चर्चेला आल्या. जी अनेक अधिकारपदे केवळ इंग्रजांसाठी राखीव होती, ती स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारतीयांसाठी मोकळी झाली. 'राज्यपाल' हे त्याच प्रकारचे पद होते. १९४७ ते ५२ या काळात मा. श्री. अणे हे बिहारचे राज्यपाल होते. (त्यांच्या नावाचा 'अणे-मार्ग' आजही पाटण्यात आहे.) पण ५२ पासून ६०सालापर्यंत कोणीही मराठी माणूस राज्यपाल नव्हता. १९६० साली काकासाहेब गाडगीळ व हरिभाऊ पाटसकर यांना अनुक्रमे पंजाब व मध्यप्रदेश या राज्यांचे राज्यपाल नेमण्यात आले. केंद्रीय मंत्रिमंडळात महत्त्वाचे असे अर्थखाते श्री. चिंतामणराव देशमुख यांच्याकडे होते खरे; पण श्री. देशमुख यांना काहीच राजकीय वजन नव्हते. ते काँग्रेसचे सभासदही नव्हते. केवळ अर्थतज्ज्ञ या नात्याने ते अर्थमंत्री झाले होते.

महाराष्ट्राची ही पीछेहाट महाराष्ट्रातील राजकारणी वर्गाला व विचारवंतांना फार सलत असे. मला आठवते त्याप्रमाणे १९५४ साली मुंबईच्या 'मौज' या वजनदार साप्ताहिकाने एक वर्षभर महाराष्ट्राच्या राजकीय अपकर्षाचा विचार करणारी चर्चा चालविली होती. त्यात रिसायतकार सरदेसाई, महर्षी कर्वे, धनंजयराव गाडगीळ अशा नाणावलेल्या विचारवंतांनी लेख लिहिले होते. त्याची एक पुस्तिकाही 'मौज'ने प्रसिद्ध केली होती. या लेखमालेतील बऱ्याच लेखांत अतिशय जपून व प्रश्न फार नाजूक आहे, याचे भान ठेवत महाराष्ट्रातील मूलभूत दुफळीचा उल्लेख आला होता. ती दुफळी म्हणजे स्वातंत्र्यचळवळीतून आलेले अभिजनवर्गाचे नेतृत्व आणि दरडोई मतदानाचा हक्क प्राप्त झाल्यामुळे येऊ घातलेले बहुजन समाजाचे नेतृत्व यांच्यातील होय. बावन्न साली जी निवडणूक झाली, ती भारतातील पहिली सार्वत्रिक निवडणूक होती. १९४६सालची निवडणूक झाली, तेव्हा एकूण नागरिकांपैकी फक्त १८ टक्के लोकांनाच मतदानाचा अधिकार होता व त्या अधिकाराचा मूलाधार आर्थिक पत हा होता. साहजिकच ५२ सालच्या निवडणुकीत मुख्यतः मराठा समाजाच्या अपेक्षा फार उंचावल्या होत्या; पण त्याबरोबरच त्या समाजातील नेतृत्वात स्पर्धाही निर्माण झाली होती. स्वातंत्र्यचळवळीशी उशिरा संबंध आलेले मराठा नेते काँग्रेसमधून बाहेर पडले व त्यांनी शेतकरी कामगार पक्ष काढला; तर काही नेते महाराष्ट्र काँग्रेसमधील ब्राह्मणी नेतृत्वाची जमेल तितकी बूज राखत काँग्रेसमध्येच राहिले. ५२ सालच्या निवडणुकांत काँग्रेसमधून बाहेर पडलेल्या सर्वच घटकांचा सपाटून पराभव झाला. परिणाम असा झाला की, महाराष्ट्र काँग्रेसमधील ब्राह्मणनेतृत्व, नेहरूंच्या वलयांकित नेतृत्वाच्या पाठिंब्यावर अबाधित राहिले. एखाद्या भिंतीत वाढलेले झाड ज्याप्रमाणे त्या भिंतीला खिळखिळी करून सोडते, त्याप्रमाणे ही जातीयवादाची मुळे महाराष्ट्र काँग्रेसला कोलमडून टाकत होती. मराठी नेतृत्वाला केंद्रस्थानी हेटाळणीची वागणूक मिळत होती, त्याचे कारण हे असे होते.

महाराष्ट्र व राष्ट्रीय नेतृत्व यांच्यातील कडवट संबंधांच्या रखरखीत पृष्ठभूमीवरून आपण जेव्हा १९६२ साली यशवंतराव चव्हाणांना दिल्लीला संरक्षण-मंत्रिपदासाठी बोलावून घेण्यात आले या घटनेकडे पाहतो, तेव्हा जातीयवादाच्या पलीकडे जाऊन महाराष्ट्राच्या भवितव्याची काळजी करणाऱ्या सुबुद्ध विचारकांना त्या घटनेचे केवढे अप्रूप वाटले असेल, त्याचा अंदाज आपल्याला येतो.

(१)

आज आपल्याला तालुक्यातालुक्यांत फारशी उमेदवारी न करता नेतृत्वपदी पोचलेले राजकारणी आढळून येतात. आता समाज व्यक्तीने केलेली समाजसेवा विचारात घेण्यापेक्षा घराण्याने केलेली समाजसेवा लक्षात घेऊन पुढाऱ्याची निवड करतो. यशवंतराव चव्हाण हे अशा प्रकारचे पुढारी नव्हते. एकोणीसशे तीसचाळिशीच्या दशकात बहुजन समाजातील पहिल्या पदवीधर पिढीतील होतकरू तरुण राजकारणात आले. बहुजनसमाजातील पारंपरिक पुढारीपण वजनदार खानदानातील प्रौढांकडे होते. त्यांचे राजकारण हे बहुतेक इंग्रज नोकरशाहीच्या कलाने चाले. ह्या नवीन पिढीने नवी वाट चोखाळून गांधींच्या कायदेभंगाच्या चळवळीत

भाग घेतला. ते तुरुंगात गेले. तेथील बराकीत त्यांचा संबंध ज्येष्ठ व उच्च जातीतील देशभक्तांशी आला. या देशभक्तांच्या सहवासात या तरुणांनी विविध राजकीय तत्त्वप्रणालींचा अभ्यास केला. आपली वैचारिकता जोपासली. तुरुंगातून बाहेर आल्यावर त्यांनी गावोगावी जाऊन काँग्रेस पक्षाची संघटना बांधली. हे सर्व करताना त्यांच्या आधीच्या पिढीतील द्वेषमूलक ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद त्यांनी काहीसा बाजूला ठेवला. यशवंतरावांच्या राजकीय जडणघडणीचा असा मागोवा घेता येतो.

१९४६ सालच्या निवडणुकीत यशवंतराव विधानसभेत निवडून गेले. काही विशेष योगायोगाने ते खेरमंत्रिमंडळातील गृहमंत्री मोरारजी देसाई यांचे संसदीय सचिव बनले. मोरारजी हे ब्रिटिश प्रशासकीय सेवेत होते. त्यामुळे मंत्री या नात्याने प्रशासनावर कसा काबू ठेवायचा, याची हातोटी त्यांना साधली होती. यशवंतरावांनी मोरारजींच्या मार्गदर्शनाखाली प्रशासनाचे धडे गिरविले. १९५२ साली यशवंतराव फिरून विधानसभेवर निवडून गेले. आता मोरारजी मुख्यमंत्री झाले होते. त्यांच्या मंत्रिमंडळातील हिरे, चव्हाण, मालोजीराजे निंबाळकर आणि गणपतराव तपासे हे चारही मंत्री ब्राह्मणेतर होते. त्यांपैकी यशवंतराव चव्हाण हे मोरारजींच्या विशेष मर्जीतील होते, तर हिऱ्यांशी मोरारजींचे अजिबात पटत नसे. त्यामुळे हिरे-चव्हाण यांच्यात, हिरे अनेक वर्षांनी ज्येष्ठ असूनही, स्पर्धा चालत असे. हे लक्षात घेण्याजोगे आहे की, या मंत्र्यांवर भ्रष्टाचाराचा कोणताही आरोप कधी आला नाही.

१०ऑक्टोबर १९५५ रोजी राज्य-पुनर्रचना-आयोगाचा अहवाल प्रसिद्ध झाला. मराठी भाषकांच्या राज्याविषयी या अहवालात काय तरतुदी आहेत, याचा अंदाज आधीच आला होता. अहवालाची शिफारस अशी होती, की पश्चिम महाराष्ट्र, मराठवाडा, मुंबई, गुजरात व सौराष्ट्र यांचे एक द्विभाषिक राज्य बनवावे व विदर्भाचे वेगळे मराठी-भाषिक राज्य करावे. महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (मप्रकाँ) ची पूर्वीपासून भूमिका ही होती की, सर्व मराठी भाषिकांचे एकच महाराष्ट्र राज्य असावे व मुंबईचा ह्या राज्यात समावेश झालाच पाहिजे. रापुआची सूचना व मप्रकाँची भूमिका यांची सांगड घालण्याच्या प्रयासातून अनेक पर्याय पुढे आले व मप्रकाँचे जेष्ठ नेते आणि चव्हाण-निंबाळकरांसारखे मध्यम पातळीवरील नेते यांच्यात मतभेद होण्याचे प्रसंग आले. त्याचा थोडक्यात आढावा घेऊ.

प्रदेश काँग्रेसचे पुढारीपण देव-देवगिरीकर-गाडगीळ व हिरे यांच्याकडे होते. देव हे काँग्रेसचे सभासदही नव्हते. पण ते प्रदेश काँग्रेसचे मार्गदर्शक आणि सर्व-पक्षीय संयुक्त महाराष्ट्र परिषदेचे अध्यक्ष म्हणून केंद्रीय पुढाऱ्यांशी चाललेल्या वाटाघाटीत असत. ऑक्टोबर ११५५ मध्ये झालेल्या वाटाघाटींत केंद्रीय नेतृत्वाने– म्हणजे, खरेतर पंडित नेहरूंनी– दोन पर्याय ठेवले. एक, रापुआचे द्विभाषिक व दोन, विदर्भासह पण मुंबईविना महाराष्ट्र. त्यावर मप्रकाँने पर्याय मांडला, की सर्व महाराष्ट्र, संपूर्ण गुजरात व मुंबई यांने महाद्विभाषिक. चव्हाणांना ही पर्यायी महाद्विभाषिकाची सूचना मान्य नव्हती. तरीही मप्रकाँमध्ये गाडगिळांनी महाद्विभाषिकाचा ठराव मांडला, तेव्हा चव्हाणांनी त्याला अनुमोदन देणारे व्याख्यान दिले.

नोव्हेंबर १९५५ मध्ये काँग्रेस कार्यकारिणीने असा निर्णय दिला, की विदर्भासह महाराष्ट्र, स्वतंत्र मुंबई राज्य आणि गुजरात अशी तीन राज्ये होतील. मोरारजी देसाई यांनी याच आशयाचा ठराव मुंबई विधानसभेत मांडला व सर्व काँग्रेस आमदारांनी ठरावाच्या बाजूने मतदान केले पाहिजे, असा आदेश काढला. या वेळी काँग्रेसच्या मराठी आमदारांची चांगलीच कोंडी झाली होती. पक्षाच्या आदेशाला धुडकावायचे की मुंबईविना महाराष्ट्राला संमती द्यायची, असा तो तिढा होता. तेव्हा देव व हिरे यांनी असा पर्याय काढला की, सर्व मराठी काँग्रेस आमदारांनी राजीनामे द्यावेत. तसे झाले असते तर एक पहिल्या दर्जाचा घटनात्मक पेचप्रसंग निर्माण झाला असता. पण देवगिरीकर व चव्हाण यांनी राजीनामे देण्याच्या मताला विरोध केला. सुदैवाने मोरारजींच्या ठरावावरील चर्चा स्थगित झाली व काँग्रेसजनांसमोरील समस्येतून काहीशी सुटका मिळाली.

दरम्यानच्या काळात मुंबईतील मराठी जनतेचा संताप पराकोटीला पोचला होता. मोर्चे, हरताळ, सत्याग्रह, क्वचित दंगेधोपे, मोठाल्या सभा या मार्गांनी तो व्यक्त

होत होता. मधूनमधून मोरारजी पोलीस गोळीबाराचा उपयोग करतील, मुंबईसकट महाराष्ट्र मिळत नाही, ह्याचा राग होताच; पण मोरारजींची अरेरावी व मनमानी खपवून घेतली जाते, याची चीड अधिक होती. अशा या ताणतणावाच्या काळात चव्हाण, मालोजीराजे निंबाळकर व तपासे या तीन मंत्र्यांनी फलटणला बैठक घेऊन मप्रकाँच्या ज्येष्ठ नेत्याविरुद्ध बंड पुकारले. 'मुंबईसकट महाराष्ट्र मिळाला नाही तरी चालेल; पण आम्ही केंद्रीय काँग्रेसच्या नेतृत्वाला आव्हान देणार नाही', असा त्यांच्या पत्रकाचा आशय होता. ९ डिसेंबर १९५५ च्या निर्णयामुळे चव्हाणांच्या भावी उत्कर्षाची पायाभरणी झाली. त्यानंतरच्या संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात प्रदेश काँग्रेसला काही स्थान उरले नाही.

१६ जानेवारी १९५६ रोजी नेहरूंनी रेडिओवर भाषण करून त्रिराज्य योजनेचा निर्णय एक महत्त्वाची दुरुस्ती करून जाहीर केला. दुरुस्ती ही होती की, मूळच्या निर्णयानुसार मुंबईचे स्वतंत्र राज्य असणार होते; आता मुंबई पाच वर्षांसाठी केंद्रशासित राहाणार होती. हा निर्णय जाहीर झाल्यावर मुंबईत प्रचंड दंगल उसळली. गोळीबार झाले. ९५ माणसे मारली गेली. सर्व कामगार-पुढारी, कम्युनिस्ट पक्षाचे नेते व कार्यकर्ते, अत्र्यांसारखे प्रखर महाराष्ट्रवादी यांना अटक करण्यात आली. यानंतर विरोधी पक्षीयांनी संयुक्त महाराष्ट्र समिती स्थापन करून लढ्याचे नेतृत्व स्वीकारले. हा लढा आता केंद्रीय काँग्रेस नेतृत्व विरुद्ध महाराष्ट्र असा न राहता काँग्रेस विरुद्ध समिती या स्वरूपात लढला गेला. मुंबईत झालेल्या गोळीबाराची न्यायालयीन चौकशी व्हावी, ही मागणीही नेहरू-मोरारजी यांनी फेटाळून लावली.

मुंबईचे स्वतंत्र राज्य करण्याचा प्रस्ताव मागे घेऊन ती केंद्रशासित ठेवण्याचा बूट काढण्याचे प्रयोजन हे होते की, त्यापूर्वी मुंबई महानगरपालिकेत 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र झाला पाहिजे', असा ठराव मंजूर झाला होता. मुंबईचे स्वतंत्र राज्य झाल्यास त्या राज्याकडून महाराष्ट्रात विलीन होण्याची मागणी पुढे येण्याचा संभव होता. त्यानंतर ऑगस्ट १९५६ मध्ये राज्यपुनर्रचना विधेयक संसदेत मांडण्यात आले. त्यातही केंद्रशासित मुंबई आणि गुजरात व महाराष्ट्र ही वेगळी राज्ये अशीच तरतूद होती. या विधेयकावर चर्चा होण्यापूर्वीच चिंतामणराव देशमुख यांनी केंद्रसरकारच्या महाराष्ट्रविषयक धोरणाचा निषेध म्हणून अर्थमंत्रिपदाचा राजीनामा (जो त्यांनी जानेवारीतच दिला होता) दिला. याच वेळी सं.म.समितीने दिल्लीत एक विराट मोर्चा काढला. त्यापूर्वी मुंबईत व महाराष्ट्रात समितीने सत्याग्रहाची मोहीम राबविली. या सगळ्याचा परिणाम म्हणून म्हणा किंवा निवडणुका जवळ आल्या होत्या म्हणून म्हणा, काही विरोधी पक्षीयांनी मूळ कलमाला पर्याय म्हणून महाद्विभाषिकाची सूचना पुढे आणली. त्या सूचनेला केंद्रसरकारने मान्यता दिली. एक नोव्हेंबर १९५६ला पुनर्रचित राज्यें स्थापन होणार होती, तेव्हाच महाद्विभाषिकही अस्तित्वात येणार होते.

(२)

महाराष्ट्र व गुजरात येथील जनतेच्या मनोभावनांपासून काँग्रेसश्रेष्ठी किती दूर राहिले होते, याचे एक गमक म्हणजे मोरारजींनीच महाद्विभाषिकाचे मुख्यमंत्री राहावे, असा त्यांनी धरलेला आग्रह. मोरारजी हे महाराष्ट्रात तिरस्कारचा विषय झालेले होतेच; पण महाद्विभाषिकाचा निर्णय होताच गुजरातमध्ये उसळलेल्या दंगलीतही पोलिसांनी बेलगाम गोळीबार केल्याने गुजरातेतही त्यांना स्थान उरले नव्हते. गुजराथी जनतेला महाद्विभाषिकाचा निर्णय समजावून सांगण्यासाठी मोरारजींनी एक सभा घेतली, तेव्हा जनतेने त्या सभेवर बहिष्कार टाकला. सभेला पोलिसांखेरीज कोणीच उपस्थित नव्हते. तेव्हा मोरारजींनी ७ दिवस उपोषण करून मोठ्या खटपटीने पुनः सभा बोलावली. त्या सभेतही गोळीबार करावा लागला. साहजिकच मोरारजी मुख्यमंत्री होण्यास तयार नव्हते, पण काँग्रेसश्रेष्ठींच्या आग्रहाखातर त्यांनी एका अटीवर मुख्यमंत्रिपदाला मान्यता दर्शविली. ती अट अशी की, आपली निवड एकमताने व्हावी. केवळ मोरारजी नकोत इतक्यासाठी भाऊसाहेब हिरे यांनी आपली उमेदवारी जाहीर केली. त्यामुळे मोरारजींच्या मुख्यमंत्रिपदाचा प्रश्न निकालात निघाला. मग मोरारजींच्या आशीर्वादाने यशवंतराव चव्हाण यांनी पक्षनेतेपदाची निवडणूक हिऱ्यांच्या विरोधात लढविली व ३३३ विरुद्ध १११ मतांनी जिंकली.

द्वैभाषिकाचे मुख्यमंत्रिपद हे एक आव्हानच होते.








महाराष्ट्राच्या दृष्टीने यशवंतराव हे महाराष्ट्रावर सौराष्ट्र, कच्छ, गुजरात व विदर्भ यांनी लादलेले मुख्यमंत्री होते. महाराष्ट्राच्या लढ्याला त्यांनी फितुरीचा सुरुंग लावला होता. गुजरातमध्येही द्विभाषिकाविरुद्ध तीव्र भावना होत्या. महाद्विभाषिक ही मुंबईतील भांडवलदारांनी मुंबई महाराष्ट्रात जाऊ नये, यासाठी स्वीकारलेला पर्याय होता. पण यशवंतरावांसारखा महाराष्ट्राच्या परसातला अनगड मनुष्य मुंबईत येऊन राज्य करील, अशी अपेक्षा त्यांना नव्हती. या सर्व प्रतिकूलतांना तोंड देताना यशवंतरावांना एकच आधार दिसत होता, तो म्हणजे 'आपला माणूस सत्ताधारी झाला' ही बहुजनसमाजाच्या मनात पालवलेली भावना. तिचा उपयोग करीत यशवंतरावांनी मराठा समाजाला संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न विसरायला लावला. 'द्विभाषिकातच मी तुम्हाला महाराष्ट्राचे फायदे मिळवून देतो', या त्यांच्या आश्वासनाला 'हा आडमार्ग कशाला? महाराष्ट्रच मिळवून द्या की!' असे हजरजबाबी प्रत्युत्तर अत्र्यांनी दिले होते खरे; पण बहुजनसमाजाला मात्र चव्हाणांच्या आश्वासनाचा प्रत्यय त्यांनी शेती, सहकारी साखर कारखाने, जलसिंचन योजना यांना जे प्रोत्साहन दिले, त्यातून येत होता. आपल्यातला एक मनुष्य मुंबईच्या धनत्तर शेठजी व उद्योगपतींबरोबर न बुजता वावरतो, त्यांनी दिलेल्या मेजवान्यांमध्ये आपली आदब राखत भाग घेतो, परदेशी पाहुण्यांशी नि:संकोच बोलणी करतो, रावणाच्या लंकेपेक्षही समृद्ध अशा मुंबईनगरीला सांभाळतो, याचे अपार कौतुक कानाकोपऱ्यांत पसरलेल्या शेतकऱ्यांना वाटू लागले होते.

द्विभाषिक अस्तित्वात आल्यावर चारच महिन्यांत, १९५७ च्या मार्चमध्ये, सार्वत्रिक निवडणुका झाल्या. पश्चिम महाराष्ट्र व मराठवाडा इथे काँग्रेसचा दारुण पराभव झाला. स.महाराष्ट्र समितीने पश्चिम महाराष्ट्र व मराठवाड्यातील १४७ पैकी १११ जागा जिंकल्या. याच भागात लोकसभेच्या २२ जागा होत्या, त्यांतील वीस जागा समितीने जिंकल्या. स्वातंत्र्यलढ्यातून नावारूपाला आलेली काँग्रेस नेत्यांची पिढी गारद झाली. काकासाहेब गाडगीळ, हरिभाऊ पाटसकर, आळतेकर, मोरोपंत जोशी इत्यादी बुजुर्ग पराभूत झाले. स्वतः यशवंतराव आपले विरोधक व्यंकटराव पवार यांच्यावर अवघ्या १६२५ मतांनी मात करून निवडून आले. पण काँग्रेसचा हा पराभव यशवंतरावांच्या पथ्यावरच पडला. ज्येष्ठ पुढारी नामशेष झाल्याने महाराष्ट्र काँग्रेसवर यशवंतरावांना आपला कब्जा बसवता आला. देवगिरीकरांना अध्यक्षपदावरून उतरवून मालोजीराजे नाईक निंबाळकर या विश्वासातील मनुष्याला मप्रकाँचे अध्यक्ष करता आले. दुसरी बाजू म्हणजे, द्विभाषिक मराठी जनतेला पसंत पडत नाही, हे काँग्रेसश्रेष्ठींपुढे लखलखीतपणे ठेवले गेले. त्यामुळेच संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीचा मार्ग सुकर होत गेला.

मुंबई महाराष्ट्राला द्यायला विरोध होत होता, त्याचे कारण मुंबईचे बहुजनीत म्हणजे कास्मॉपॉलिटन स्वरूप मराठी राज्यात टिकणार नाही, ही भावना मराठेतरांत दृढमूल होती, हे होते. मुंबईतील भाटिये, पारशी, सिंधी, गुजराती उद्योगपतींना अशी भीती वाटे की, कोणी अर्बुन्न बहुजनसमाजोत्पन्न नेता मुख्यमंत्रिपदी आला व मुंबईचा कारभार आपल्या संकुचित दृष्टिकोनातून रेटू लागला, तर आपल्या उद्योगांवर त्याचा विपरीत परिणाम होईल. शंकरराव देवांनी उद्योगपतींच्या व व्यापाऱ्यांच्या भेटी घेऊन त्यांची ही भीती दूर करण्याचा अनौपचारिक प्रयत्न केला होता, असे ते सांगतात. पण यशवंतरावांनी आपल्या सौजन्यशील सर्वसमावेशक शासनातून मुंबईतल्या धनिकांची खात्री पटविली की, बहुजनसमाजी नेतृत्वही मुंबईचे वैशिष्ट्य व असाधारणत्व कायम राखूनच राज्य चालवील.

१९५७ च्या नोव्हेंबरात प्रतापगडावरील शिवाजी महाराजांच्या पुतळ्याचे उद्घाटन पंतप्रधान नेहरूंच्या हस्ते होणार होते. नेहरूंच्या विरोधात शांततापूर्ण पण प्रभावी निदर्शने करण्याचा निर्णय संयुक्त महाराष्ट्र समितीने घेतला. पोलादपुरापासून पाचगणीपर्यंत रस्त्याच्या दोन्ही बाजूंना सारे उन्हातान्हात उभे राहून संयुक्त महाराष्ट्राच्या घोषणा देत होते. ती प्रचंड निदर्शने पाहून नेहरूंची खात्री पटली, की द्विभाषिक राखण्याचा प्रयत्न केला, तर निवडणुकीत काँग्रेसचा फार मोठा पराभव होईल. त्या वेळी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुका झाल्या होत्या. सांगली नगरपालिका वगळता सर्वत्र






समिती विजयी झाली होती. ही वस्तुस्थिती ध्यानात घेऊनच काँग्रेसश्रेष्ठींनी मुंबईसकट महाराष्ट्र व गुजरात ही राज्ये वेगळी करण्याचा निर्णय घेतला व १ मे १९६० रोजी महाराष्ट्राचा 'मंगल कलश' नेहरूंनी यशवंतरावांच्या हाती सोपविला.

संयुक्त महाराष्ट्र अस्तित्वात आल्यावर संयुक्त महाराष्ट्र समितीचे प्रयोजन संपले होते. समितीतील विविध घटकपक्ष समितीतून बाहेर पडू लागले. कित्येक आमदार काँग्रेसमध्ये सामील झाले. महाराष्ट्र द्विभाषिकातून निराळा करताना काँग्रेसश्रेष्ठींना जो धोका वाटत होता, की महाराष्ट्र विधानसभेत काँग्रेस अल्पमतात जाईल, तो निर्मूल ठरला. शेतकरी कामगार पक्षातील अनेक आमदार व कार्यकर्ते 'आता बहुजन समाजाचे राज्य आले' या हाकेवर काँग्रेसमध्ये सामील झाले. माधवराव बागल यांनी तर हाकच दिली, की 'यशवंतरावांनी बहुजनांसाठी पंगती मांडल्या आहेत. पाटावर बसायला चला!' विरोधी पक्षाच्या वाताहतीचे ठळक उदाहरण म्हणजे १९५९ साली पुणे मनपाची निवडणूक काँग्रेसने लढविलीही नव्हती; सन १९६१ साली पुणे मनपामध्ये काँग्रेसचे बहुमत झाले होते!

समाजातील विविध घटकांना व महाराष्ट्राच्या विविध विभागांना खूश राखत राज्य एकजिनसी व समाधानी ठेवण्याचे काम यशवंतराव करीतच होते. महाराष्ट्र राज्य 'मराठी होणार की मराठ्यांचे होणार', या प्रश्नाचे निखालस उत्तर यशवंतरावांनी 'हे राज्य मराठीच होणार; मराठ्यांचे नव्हे', असे दिले होते. आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकांसाठी मोफत शिक्षण, महार-वतनांचा कायदा, गांधीहत्येनंतर जळितात ज्यांना हानी पोचली होती, अशा ब्राह्मणांना कर्जमाफी, मराठवाडा व विदर्भ यांना जादा अनुदाने अशा अनेक प्रशासकीय निर्णयांचे मोठे स्वागत झाले. बुद्धिजीवी वर्गासाठी साहित्य-संस्कृती मंडळ व विश्वकोश यांची स्थापना करण्यात आली. १९६१ साली पुण्यावर पानशेतची आपत्ती कोसळली. त्या वेळी आपत्ती-निवारण्याचा कित्ता ठरावी, अशी पद्धती त्यांनी अमलात आणली.

यशवंतरावांच्या दिल्लीला जाण्यापूर्वीच्या कारकिर्दीचा इतका विस्तृत आढावा इथे घेतला याचे कारण असे की, एका कोपऱ्यातल्या गावातल्या सामान्य व शिक्षणाची परंपरा नसलेल्या कुटुंबातला मुलगा केवढे संचित घेऊन वयाच्या ५० व्या वर्षी दिल्लीला निघाला होता, याचे आकलन व्हावे.

(३)

१९६१च्या नोव्हेंबरमध्ये पंतप्रधान नेहरूंनी चव्हाणांना संरक्षणमंत्रिपद सांभाळण्यासाठी बोलावून घेतले, ते अगतिक झाल्यामुळे. चिनी आक्रमणापुढे भारतीय सैन्याला माघार घ्यावी लागली. चिनी आक्रमणाची शक्यता नेहरूंना नव्हती, म्हणून ते स्वतः आणि सैन्याची तयारी नव्हती यासाठी कृष्ण मेनन यांना संसदीय काँग्रेसपक्ष जबाबदार धरत होता. आपल्यावरील आरोपातील तथ्याची जाणीव असल्यानेच नेहरू कृष्ण मेनन यांना पद सोडण्यास सांगत नव्हते. पण संसदीय काँग्रेसपक्षाच्या दडपणामुळे मेनन यांचा राजीनामा बरेच आढेवेढे घेऊन नेहरूंनी स्वीकारला व चव्हाणांकडे हे पद सोपवले. चिनी आक्रमणानंतर संरक्षण विभागाची नव्याने घडी बसवावी लागेल, लढाईतील पराभवाची संसदेत छाननी होईल, त्याला धीराने तोंड द्यावे लागेल, अमेरिका-इंग्लंड या देशांकडून नवीन शस्त्रसामग्री मिळविण्याच्या वाटाघाटी कराव्या लागतील. या सर्व कामांसाठी ज्यावर कोणताही दोषारोप नाही, जो कारभाराला चोख आहे, लोकांना बरोबर घेऊन काम करणारा आहे, ज्याला पक्षात विरोध नाही, असा नवा चेहरा राष्ट्रीय राजकारणाच्या मंचावर आणला पाहिजे, या हेतूने नेहरूंनी चव्हाणांना संरक्षण-मंत्री केले. चव्हाणांनी ही सर्व कामगिरी इतक्या कौशल्याने तडीस नेली की, १९६३ मध्ये वेलेस हँगेन या पत्रकाराने 'आफ्टर नेहरू, हू?' या नावाचे पुस्तक लिहिले, त्यात नेहरूंच्या संभाव्य वारसदारांत चव्हाणांचा समावेश केला.

इतक्या अपेक्षा ज्याच्याविषयी बाळगल्या गेल्या होत्या, असा राजकीय नेता नंतर देशाच्या सर्वोच्च राजकीय पदावर पोचू शकला नाही, याची काहीशी मीमांसा आपण इथे करणार आहोत. केंद्रीय मंत्रिमंडळात संरक्षणमंत्री, गृहमंत्री, परराष्ट्रमंत्री, अर्थमंत्री व अखेर उपपंतप्रधान इतक्या महत्त्वाच्या पदांवर चव्हाणांनी १५ वर्षे काम केले. ते पंतप्रधान झाले नाहीत, याला मी तितके महत्त्व देत नाही. पण कामराज, अर्जुन सिंग, अत्युल्य घोष,








निजलिंगप्पा यांच्यासारख्या त्यांच्याहून कितीतरी कमी वकुबाच्या माणसांना प्रसंगाप्रसंगाने जे निर्णायक महत्त्व आले, तसे महत्त्वही चव्हाणांना त्यांच्या दिल्लीतील कारकिर्दीत लाभले नाही, याची खंत वाटते. या संदर्भात नरसिंह राव आणि चव्हाण यांच्या कर्तृत्वपटाची तुलना करणे, उद्‌बोधक होईल. यशवंतरावांनी स्वातंत्र्य चळवळीत भाग घेतला त्याचप्रमाणे नरसिंह रावही हैदराबादच्या स्वातंत्र्यलढ्यात सामील होते. यशवंतरावांनी १९४६ ते १९६२ अशी १६ वर्षे राज्यस्तरीय मंत्रिपदावर काढली व शेवटी मुख्यमंत्री ते होते, त्याचप्रमाणे नरसिंह राव १९६१ पासून १९७३ पर्यंत १२ वर्षे आंध्रच्या मंत्रीमंडळात होते व शेवटी ३ वर्षे मुख्यमंत्री होते. यशवंतराव १९६२ पासून १९७७ पर्यंत १५ वर्षे केंद्रीय मंत्रिमडळात होते, तर नरसिंह राव १९८० पासून १९८९ पर्यंत इंदिरा गांधी व राजीव गांधी यांच्या मंत्रिमंडळात संरक्षण, परराष्ट्रधोरण व गृह या खात्यांचे मंत्री होते. १९८९ ते १९९१ पर्यंत काँग्रेसच सत्तेवर नव्हती. १९९१ साली ते लोकसभेच्या निवडणुकीला उभेही नव्हते. तरी १९९१ साली राजीव गांधींच्या मृत्यूनंतर व काँग्रेसला बहुमत नसतानादेखील ते पंतप्रधान व त्याच वेळी काँग्रेसचे अध्यक्ष झाले. त्यांनी पाच वर्षे एकहाती राज्य केले. जे नरसिंह राव यांना साधले, ते यशवंतरावांना का हस्तगत झाले नाही?

ही गोष्ट खरीच आहे की, देशाच्या राजकारणात सर्वोच्च पदावर पोचण्याला दैवही अनुकूल असावे लागते. सर्वोच्च पदावर पोचणे ही कसरत तेल चोपडून घसरड्या केलेल्या मलखांबाच्या डोक्यावर चढण्याइतकी कौशल्याची असते. त्यात हेही लक्षात ठेवले पाहिजे, की एकाच वेळी अनेकजण त्या मलखांबावर चढण्यासाठी झटत असतात; वरच्यांना खाली ओढत असतात व उंचीवर पोचलेले मल्ल सगळ्यांवर लाथा झाडून त्यांना दूर सारत असतात. त्यामुळे फट सापडताच उडी मारून त्या ठिकाणी चिटकून राहणे व संधी मिळेल तसे वर सरकणे हाच उपाय असतो. कृष्ण मेनन यांनी राजीनामा दिल्याने दिल्लीत जागा झाली व चव्हाण तेथे पोचले. नंदांना गृहमंत्रिपदाचा राजीनामा द्यावा लागला व चव्हाण गृहमंत्री झाले. दोन्ही वेळी अतिशय अडचणीच्या वेळी त्यांनी जबाबदाऱ्या स्वीकारल्या व समाधानकारकपणे पार पाडल्या. इंदिरा गांधी विरुद्ध काँग्रेस संघटनेचे नेते यांच्यात राष्ट्रपतिपदाच्या उमेदवारावरून चकमक उडाली. त्या वेळी चव्हाणांनी किरण साधून उंच उडी घेण्याचा प्रयत्न केला व इंदिरा गांधींच्या विरुद्ध जाऊन काँग्रेस संसदीय मंडळात संजीव रेड्डींच्या उमेदवारीला पाठिंबा दिला. एकदा ही उडी घेतल्यावर आपला उमेदवार निवडून येईल, यासाठी झटून प्रयत्न करण्याची जरुरी होती; पण मराठी आमदार-खासदारांची मते संजीव रेड्डींना मिळतील एवढी खबरदारी घेण्यात ते मग्न राहिले. परिणाम असा झाला, की संजीव रेड्डींचा पराभव झालाच, पण इंदिरा गांधींचा चव्हाणांवरील विश्वासही उडाला. मोरारजींच्या कडून अर्थखाते काढून घेतल्यानंतर श्रीमती गांधी पुपुल जयकर यांना म्हणाल्या होत्या, की 'मोरारजी सरळ व शिस्तीचे गृहस्थ आहेत. खरे कपटी चव्हाण आहेत. पण त्यांना शिक्षा न होता, मोरारजींना मात्र शिक्षा झाली.'

यशवंतराव या प्रसंगी अधिक निर्णायक भूमिका घेऊ शकले नाहीत, याला दोन कारणे होती. एक म्हणजे जरी त्या वेळी ते केंद्रीय पातळीवर ७ वर्षे मंत्री म्हणून वावरले होते, तरी इतर प्रदेशांतील काँग्रेस नेत्यांत त्यांच्याशी जवळीक असणारे कोणीच नव्हते. दुसरे असे की, इंदिरा गांधींमध्ये सर्वस्व पणाला लावून स्वतःच्या हिमतीवर लढण्यासाठी जी हिंमत लागते, तिचा अभाव होता. संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात त्यांनी 'महाराष्ट्रापेक्षा नेहरू मोठे' हे ब्रीद धरून जनतेचा रोष ओढवून घेतला होता खरा; पण आपण सत्तेवर आहोत व सत्तेवरील श्रेष्ठींचा आपल्याला पाठिंबा आहे, याची त्यांना खात्री होती. संजीव रेड्डींच्या निवडणुकीच्या वेळी सारेच अधांतरी असल्याने त्यांनी संघटना नेत्यांना अर्धवट पाठिंबा दिला व इंदिरा गांधींचा जय झाल्यावर दोन्ही पक्षांत तडजोड घडविण्याचे दिखाऊ प्रयत्न करीत, त्यांनी इंदिरा गांधींचा आश्रय धरला. त्यानंतर त्यांनी महत्त्वाची मंत्रिपदे सांभाळली खरी; पण त्यामधील त्यांची भूमिका प्रशासकीय सेवेतील अधिकाऱ्यांपेक्षा फारशी निराळी नव्हती. पुपुल जयकर यांनीच सांगितले आहे, की सिमल्याला भुट्टोंशी वाटाघाटी चालू होत्या, तेव्हा रोज संध्याकाळी मंत्रिमंडळाची बैठक

अनुक्रमणिका

होत असे व वाटाघाटींची हकिकत सांगितली जाई आणि इंदिरा गांधी आपल्या सहकाऱ्यांना त्यांची मते मांडण्यास सांगत. पण कोणी काहीही बोलत नसे. एकदा तर चवताळून त्या म्हणाल्या, 'for God's sake, say something !' पण सर्वांनी खुळेपणा स्वीकारून स्वतःची कोंडी करून घेतली होती.

नरसिंह राव हे कायम इंदिरा गांधी व नंतर राजीव गांधी यांना धरून राहिले. या दोघांच्या मर्जीविरुद्ध यत्किंचितही वागण्याचा प्रयत्न त्यांनी केला नाही. ते ब्राह्मण असल्याने त्यांच्या आंध्रप्रदेशात त्यांचा कायमचा मतदारसंघ असा नव्हताच. दिल्लीत त्यांची वर्णी लागणे, हे सर्वस्वी काँग्रेसश्रेष्ठींच्या कृपेवर अवलंबून होते. राज्यपातळीवरील राजकारणातील हे ठेंगणेपण गांधी-घराण्याचा विश्वास संपादन करण्यास साहाय्यभूत झाले. त्याचबरोबर त्यांची वैयक्तिक गुणसंपदा फार मोठी होती. आठ भारतीय भाषा व परकीय भाषा यांच्यावर त्यांचे प्रभुत्व होते, असे सांगतात. त्यांचे चौफेर वाचन, वादविवादकुशलता, दीर्घदृष्टी यांच्यामुळे ते गांधीघराण्याच्या दरबारातील एक चमकदार रत्न म्हणून गणले जाऊ लागले. राजीव गांधींच्या हत्येनंतर बहुमताच्या काठावर असणाऱ्या काँग्रेसपक्षाला नरसिंह रावांचाच आधार वाटला. सोनिया गांधी यांनीही या निवडीला मूक किंवा सशब्द संमती दिली असली पाहिजे. पण एकदा सत्ता मिळाल्यावर नरसिंह रावांनी कुणाची भीड न बाळगता महत्त्वाचे निर्णय घेतले. पंजाबातील दहशतवादाचा प्रश्न सोडवला, नवीन आर्थिक धोरण राबविले, सोव्हिएट युनियनच्या पतनानंतर शीतयुद्धोत्तर परिस्थितीतील नवीन धोरणाची आखणी केली. मुख्य म्हणजे मंत्रिमंडळ एकत्र राखले. या ना त्या युक्त्या वापरून सरकार पाच वर्षे टिकविले. नेहरू-गांधी घराण्याच्या बाहेरील कोणाही मनुष्याने इतके यश मिळवले नव्हते.



---












# संरक्षणमंत्री यशवंतराव चव्हाण

विश्वास दांडेकर

यशवंतराव चव्हाण भारताचे संरक्षणमंत्री म्हणून १९६२ च्या शेवटाला केंद्रीय मंत्रिमंडळाचे सदस्य झाले. ०१/०५/१९६०- महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री व केवळ २।। वर्षांतच ते पद सोडून केंद्रात जाणे त्यांना भाग पडले. (द्वैभाषिकाचे मुख्यमंत्री म्हणून १९५५-६० हा काळ आहेच, पण महाराष्ट्र राज्यात मुख्यमंत्री म्हणून निर्णय घेतानाचे स्वातंत्र्य व अधिकार त्यांना होता. ती परिस्थिती द्वैभाषिकात असणे शक्य नव्हते.) नवनिर्मित महाराष्ट्र राज्यात अनेक गोष्टी घडवणे, त्यांच्या मनांत असूनही करणे, राहून गेल्याची चुटपुट त्यांना लागली असावी. केंद्रात गेल्यावरही त्यांच्या शब्दाला महाराष्ट्राच्या शासन-प्रशासनात पुरेसे वजन असले, त्यांचा शब्द झेलला जात असला, तरी प्रत्यक्ष त्या स्थानी असताना जे घडवता येते, ती शक्यता १०० टक्के तशीच राहत नाही, हे उघड आहे.

१९६२ च्या चीनबरोबरच्या सीमायुद्धात भारताला लाजिरवाणा पराभव स्वीकारावा लागण्याच्या परिणामी खूपच उलथापालथ देशाच्या राजधानीत झाली. संरक्षणमंत्री म्हणून यशवंतरावांचे यश-अपयश आज त्यांच्या जन्मशताब्दी वर्षांत पाहताना ज्या परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर त्यांनी नवी जबाबदारी स्वीकारली, ती थोडक्यात पाहायला हवी. हे दोन भागांत करणे सोयीचे आहे. एक : अडथळे, दोन : अनुकूलता. (इथे मला SWOT Analysis : Strength, Weakness, Opportunities & Threat's हे व्यवथापनशास्त्रातले तत्त्व अभिप्रेत नाही. त्या शास्त्रात हे केव्हाच कालबाह्य झाले आहे.)

तर प्रथम अडचणी :

१) प्रश्न 'नवी दिल्ली' हाच. यशवंतराव दिल्लीला जाण्याआधी १५/१६ वर्षे मुंबईला विधिमंडळ-मत्रिमंडळ या राजकारणात होते. त्यामुळे 'कॅबिनेट सिस्टिम', सभागृहातली 'देवाणघेवाण' वगैरे त्यांना उत्तम प्रकारे अवगत होते. प्रशासनावरची त्यांची पकड वाखाणली जात असे. या काळात प्रशासन-पक्ष अशा दोन्हीकडे दिल्लीला त्यांचे संबंध येणे साहजिक होते. मात्र हे 'दुरून डोंगर साजरे', 'नवी दिल्ली' हे प्रकरण निराळे. जर यशवंतराव प्रथम तिथे खासदार (लोकसभा) उपमंत्री-राज्यमंत्री-मंत्री असे काही काळ वावरत संरक्षणमंत्री झाले असते, तर दिल्लीतले 'जाळे' त्यांना पुरेसे परिचयाचे होत सवयीचे झाले असते. तसे नसल्याने त्या अनोळखी पाण्यात प्रवाहभोवरे माहीत नसताना उडी घेणे ही अडचण वाटणे स्वाभाविक आहे.

२) यशवंतराव संरक्षणमंत्री म्हणून येणे त्या पदाची आकांक्षा असणाऱ्यांना रुचणे-पचणे शक्य नव्हते. यात प्रामुख्याने दोन व्यक्ती होत्या. १) ओरिसाचे तत्कालीन मुख्यमंत्री श्री. विजयानंद पटनायक, २) मद्रास (तत्कालीन-आज तामिळनाडू) इथले श्री. टी. टी. कृष्णम्माचारी. या दोघांची तपशिलात पूर्वपीठिका इथे आवश्यक नसावी. इंडोनेशियात कम्युनिस्टांनी तिथले शासन अस्ताव्यस्त करत सत्तासंपादनाचा प्रयत्न पन्नाशीच्या दशकात केला होता. त्या वेळी भारताने इंडोनेशियाला मदत पुरवली होती. श्री. पटनायक हे लढाऊ विमानदलात एके काळी वैमानिक होते. त्या इंडोनेशियाच्या मदत-उपक्रमात त्यांचा सहभाग होता. त्या आधारावर ते संरक्षणमंत्रिपदावर दावा करत होते. यशवंतराव दिल्लीला पोचल्यावरदेखील त्यांना 'तुम्ही इथे येण्यात चूक करता आहात', असे त्यांनी ऐकवले. प्रत्यक्ष सीमायुद्धाच्या काळात ते संरक्षणखात्यात बसून काही प्रकरणे हाताळत होते. याला नेहरूंची संमती असणार, हे उघड आहे. त्या आधारावरच त्यांना हे पद आपले असे वाटत होते.

श्री. टी. टी. के. हे प्रकरण निराळे. मद्रास प्रांतात ते एक नावाजलेल्या उद्योगपती-व्यापारी घराण्यातले. त्यांना परदेशव्यापाराचा अनुभव होता. सीमायुद्ध पेटण्याआधीही भारत काही शस्त्रे आयात करत होताच.







अनुक्रमणिका

या वाटाघाटींमध्ये टी. टी. केंचा सहभाग असे. युद्धाच्या परिणामी आता शस्त्रखरेदी मोठ्या प्रमाणावर वाढणार, हे आपल्या माहितीचे क्षेत्र आहे, सबब मी संरक्षणमंत्री असा त्यांचा दावा होता. यशवंतरावांचा शपथविधी झाल्यावरही शस्त्रखरेदी मात्र माझ्या अखत्यारीत हवी, हे म्हणणे त्यांनी लावून धरले– काही प्रमाणात यशस्वीपणे, काही काळ.

३) राज्य व केंद्र यांत अर्थ, शिक्षण, उद्योग, गृह...वगैरे खाती दोन्हींकडे असतात. दोन खाती अशी आहेत, जी राज्यांकडे नसतात; असणे शक्यही नाही. संरक्षण व परराष्ट्र व्यवहार. त्यामुळे शासन-प्रशासन यांत यशवंतरावांचा अनुभव खूप मोठा असला, तरी 'संरक्षण' या विषयात त्यांना माहिती आणि अनुभव असणे शक्य नव्हते. तशी संधीच कधी आली नव्हती. पडते घर–पडझड वादळामुळे ते सावरणे व हे करत असताना 'घरबांधणी' म्हणजे काय याचा अभ्यासही करणे, अशा दुहेरी कात्रीतून मार्ग काढण्याचा तो काळ.

४) हे सर्व प्रश्न आपापल्या जागी मोठे होते. मात्र सर्वांत अवघड, गुंतागुंतीचा, चटकन न सुटणारा, दूरवरचे नियोजन आवश्यक असलेला प्रश्न सीमायुद्धात चीनने दिलेल्या जबरदस्त चपराकीमुळे उद्‌भवलेला होता. भारत-चीन सीमायुद्ध कसे शिजले, चुका कुठे-कशा झाल्या, याचा फार मोठा तपशील आता प्रसिद्ध झाला आहे. तो विस्ताराने इथे नोंदवणे, आवश्यक नाही. काही ठळक बाबी–

(i) सैन्यदलांकडे दुर्लक्ष. स्वतंत्र भारतात संरक्षण खात्याकडे हवे त्या प्रमाणात लक्ष दिले गेले नाही. आपण भारताचे सुरुवातीचे संरक्षणमंत्री पाहिले तर उत्तम राजकीय वजन, अभ्यासू वृत्ती, नवे काही घडवण्याची उमेद यांचा अभाव जाणवतो. सरदार बलदेवसिंग, महावीर त्यागी, कैलासनाथ काटजू – मध्ये काही महिने गोपाळस्वामी अय्यंगार. श्री. अय्यंगार यांना प्रश्नांची जाण होती, उमेद होती, दबदबा होता; पण त्यांचा एकाएकी तडकाफडकी मृत्यू झाला. सरदार बलदेवसिंग गर्भश्रीमंत घराण्यातले, अतिशय शांत-आर्जवी स्वभावाचे. त्यांनी सर्व कारभार 'बाबू' मंडळीच्या हाती जाऊ दिला. महावीर त्यागी यांना पक्षात एक मर्यादित स्थान होते, पण 'संरक्षण' या विषयात ते कोरे होते. कैलासनाथ काटजू हुशार, अत्यंत यशस्वी वकील. मात्र ते थकले होते, फार राजकीय वजन नव्हते. पुढे मध्यप्रदेशचे मुख्यमंत्री म्हणून 'वरून' लादले गेले. (वरून लादणे हा प्रकार नेहरूंच्या काळापासूनच सुरू झाला.) त्यांचे तिथे हसे होत असे. १९५७ साली श्री. व्ही. के. कृष्ण मेनन संरक्षणमंत्री म्हणून नेमले गेले. ही नेमणूक झाली तेव्हा सेनादलांमध्ये आनंदाचे व अपेक्षांचे वातावरण तयार झाले. श्री. मेनन हुशार होते, आंतरराष्ट्रीय राजकारणाची जाण त्यांना होती, भूव्यूहात्मक पवित्रे त्यांना चटकन कळत. मुख्य म्हणजे ते नेहरुंचे निकटचे मित्र होते. सेनादलांना असे वाटले, की आता आपल्या म्हणण्याकडे पुरेशा गांभीर्याने लक्ष दिले जाईल. भ्रमनिरास व्हायला सहा महिनेच लागले. मेनन यांचा अहंकेंद्री स्वभाव, समोरच्याचा चटकन विनाकारण अधिक्षेप-अपमान करत राहणे व सोबत सैन्यात गटबाजीला प्रोत्साहन देत मनोधैर्य खच्ची करणे, यामुळे सैन्यात चडफड सुरू झाली. यात परिस्थितीने काही भर घातली. एकतर मेननविरोधात नेहरू काहीही ऐकून घ्यायला तयार नसत. दुसरे म्हणजे ब्रिटिश राजवटीत सेनेमध्ये अधिकारी म्हणून निवड ही सरंजामी वर्गातून केली जाई. १९५० नंतर ही निवड मोठ्या प्रमाणात मध्यम वर्गातून होऊ लागली. या दोन वर्गांच्या राहणी, जेवणसवयी, भाषा....यांमध्ये दरी होती. १५/०८/४७ला सर्वोच्च श्रेणीतला भारतीय अधिकारी 'ब्रिगेडियर' पर्यंत आला होता. त्यामुळे आधीपेक्षा जास्त गतीने बढत्या मिळत. ब्रिटिश परंपरेत वाढलेले अधिकारी मेजर जनरल व लेफ्टनंट जनरल पदापर्यंत पोचले. यांतल्या अनेकांना (सर्वांना नव्हे) ते उच्चभ्रू (High-Brow) ब्रिटिश वातावरण सोडवेना. त्या वातावरणामुळेच 'शिस्त' टिकून राहते, अशी त्यांची श्रद्धा होती. परिणामी 'मेस' मध्ये सूट-टाय असलाच पाहिजे, काट्या-चमच्यानेच जेवले पाहिजे, भारतीय म्हणजे आमटी (त्याचे डाल-सांभार वगैरे प्रकार) वा कढी हे सर्व मेसमध्ये असणार नाही, इथपर्यंत वाटचाल झाली. आपली पदोन्नती या वरच्यांच्या हाती आहे, तेव्हा अन्याय्य असले, तरी सहन केले पाहिज. तोंड दाबून बुक्क्यांचा मार. डेहराडूनच्या मिलिटरी ॲकॅडमीच्या जोडीला आता पुणे इथल्या खडकवासल्याच्या

राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीतूनही नवे अधिकारी येत होतेच. फार काळ वाफ कोंडणे शक्य नसते. या परिस्थितीवर तोडगा काढण्याऐवजी मेनन–ले. ज. कौल या दुकलीने याचे राजकारण करत व्यक्तिशः आपल्याला रुजू अधिकाऱ्यांची एक फळी निर्माण करायचा अश्लाघ्य प्रयत्न करत माणेकशॉ (त्यावेळी मेजर जनरल) यांना कोर्ट मार्शलला सामोरे जाण्यापर्यंत मजल मारली. भारत स्वतंत्र झाला, तेव्हापासून आज (जून २०१२) पर्यंत झालेल्या भारतीय सरसेनापतींमध्ये (चीफ ऑफ आर्मी स्टाफ) सर्वोत्तम, असा आजही नावलौकिक असलेल्या जनरल थिम्मय्यांची गुप्तहेर खात्याकडून चौकशी करवत, त्यांनी उठाव करत देशाची सत्ता हस्तगत करण्याचे बेत रचले आहेत, अशी अफवा जाणीवपूर्वक पसरवण्यात आली. हे सर्व कमी होते म्हणून की काय, मेनन यांचा जास्त वेळ परराष्ट्र-व्यवहार (खाते नेहरूंकडे) या क्षेत्रात नको त्या रीतीने दखल देण्यात जाई. संरक्षणाच्या प्रश्नांकडे पुरेशा तपशिलात ते उतरत नसत. अर्थात या दखल देण्यात नेहरूंची संमती गृहीत धरणे भाग आहे.

(ii) एका संरक्षण धोरणाचा अभाव : ब्रिटनने आपले 'सूर्य अस्ताला न जाणारे' साम्राज्य उभे केले, त्यातला मुख्य घटक नौदल. हे साम्राज्य टिकवण्यासाठी ईजिप्त व भारत हे सर्वोच्च प्राधान्याचे घटक होते. ईजिप्त हातचा गेला म्हणजे सुवेझ कालव्याचा हक्काचा वापर संपला. मग संपूर्ण आफ्रिकेला वळसा घालून हिंदी महासागरात येणे भाग पडले असते. जे फार काळ परवडण्यातले नव्हते. भारत जर निसटला (स्वतंत्र होणे वा इतर कुठल्या साम्राज्याचा भाग होणे.), तर ब्रह्मदेश (आता म्यानमार), श्रीलंका, इराण, मलाया, हाँगकाँग वगैरे पूर्वेतले साम्राज्यप्रभावक्षेत्र लयाला गेले असते. भारताबद्दल भीती प्रथम रशियाची होती, तर साधारण १९२० पासून जपानची. आजचा भारत-चीन सीमा प्रश्न, भारताची फाळणी (पाकिस्ताननिर्मिती) हे सर्व रशियाला मात देण्याच्या, निदान रोखण्याच्या उद्योगाचे परिणाम आहेत. (द ग्रेट गेम.) जपानच्या संभाव्य विस्ताराला पायबंद म्हणून ब्रह्मदेश-भारत जोडणारे रस्ते ब्रिटनने बांधले नाहीत. राहिल्या त्या पायवाटा. रेल्वेदेखील दिमापूरच्या पुढे आणली नाही. (नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या आझाद हिंद सेनेला या पायवाटांचाच वापर करावा लागला होता. मोठ्या तोफा, रणगाडे आणणे शक्य नव्हते व हवाई छत्र नव्हते. त्यामुळे यश मिळणे शक्य नव्हते.) धोरण असे, की सीमा या 'बफर स्टेट्स' (अफगाणिस्तान, नेपाळ, सिक्किम, भूतान...) अशा मार्गाने संरक्षित करत सीमाभागात दळणवळण सोयी करायच्या नाहीत. खडे सैन्य मर्यादित ठेवायचे. सागरी सीमा ब्रिटनच्या नौदलामुळे सुरक्षित आहेतच. जर जमीनमार्गाने कुणी आक्रमण केले, तर अवघड सीमाप्रदेशामुळे आत यायला वेळ लागेल, मधल्या काळात साम्राज्याच्या इतर भागातून फौजा आणता येतील. चीनची भीती ब्रिटनला नव्हती, कारण चीन सशक्त नव्हता. जर चीनने गडबड केलीच, तर नौदल सामर्थ्यावर त्याला नमवता येईल. स्वतंत्र भारत झाला आणि त्याच काळात जगाचा राजकीय इतिहास-नकाशा बदलला. आता २५-५० वर्षे पुढे पाहणारे नवे संरक्षणधोरण आखणे आवश्यक होते. ते झाले नाही. आम्ही स्वतः कुणावरही आक्रमण करणार नाही, त्यामुळे शत्रू असणार नाही– सबब फार विचार नको, हे तत्त्वतः ठीक असेल-नसेल; पण आंतरराष्ट्रीय राजकारण तत्त्वांवर नव्हे, तर हितसंबंधांवर बेतले जाते. (Trust in God but keep your powder Dry हे Oliver Cromwell चे वाक्य सार्वकालिक लागू पडते, हे विसरले गेले.

(iii) परिणामी असलेल्या सैन्यदलांची आबाळ झाली. त्या पन्नाशीच्या दशकात सैन्याची मागणी असे तेवढा पैसा उपलब्ध नव्हता, हे एका मर्यादेपर्यंतच खरे आहे. इथे एक फार महत्त्वाचा मुद्दा पंडित नेहरूंनी मांडला होता. देशाचे संरक्षण हे विदेशांतून खरेदी केलेल्या शस्त्रसंभारावर अवलंबून ठेवणे हिताचे नाही; कारण शक्य आहे, की गरजेवेळी आपली कोंडी केली जाऊ शकेल. हा विचार अतिशय योग्य आहे. नेहरूंनी तो मांडणे यामुळे त्याला धोरण-अंमलबजावणी या पातळ्यांवर एक वजन प्राप्त होते. मात्र धोरण प्रत्यक्षात राबवताना नुसती ढिलाई झाली एवढेच नव्हे, तर 'कमांडिंग हाइट्स ऑफ इकॉनॉमी' हे सार्वजनिक क्षेत्रातच ठेवण्याच्या हट्टापायी जो पैसा-वेळ-मनुष्यबळ या संरक्षण क्षेत्रांमध्ये गुंतवले गेले, त्या तुलनेत या संस्थांचे योगदान

समाधानकारक नव्हते, आजही नाही. या संस्थांनी काहीच केले नाही, असे म्हणणे योग्य नाही. प्रश्न गुंतवणुकीच्या तुलनेत पुरेसे नाही- नव्हते, असा आहे. साधे विमान बनविण्याचा अनुभव नसताना 'सुपरसॉनिक' विमान-निर्मितीच्या मागे लागणे, मेन बॅटल टँक-अर्जुन- याचे १६०० अश्वशक्तीचे इंजीन वीस वर्षांच्या प्रयत्नानंतरही निर्माण न करता येणे, ही काही ठळक उदाहरणे. रणगाडा इंजिन बनविण्यासाठी डिझेल इंजिने-मोठ्या अश्वशक्तीची-बनविण्याचा विस्तृत अनुभव असलेल्या भारतीय कंपनीचा तांत्रिक सहकार्याचा हात ती कंपनी खाजगी क्षेत्रात होती म्हणून दुर्लक्षित केला गेला.

दुसरे म्हणजे प्राथमिक गरज कशाची होती? तर सैनिकांसाठी वातावरणयोग्य कपडे, बूट, तंबू, घरे, अन्न व हलकी शस्त्रे यांत आधी स्वयंपूर्ण होणे आवश्यक होते. गोव्यात सैन्य पाठवले, त्यांच्या पायात कॅनव्हासचे विरलेले बूट- त्याच बुटांनिशी सैन्य लडाख, नाथूला, नामकाच्यू, वॉलांग या अतिथंड प्रदेशांत? या वस्तुनिर्मितीसाठी फार मोठे तंत्रज्ञान, परदेशी चलन आवश्यक नव्हते. हे सर्व दुर्लक्षित करण्यात आले. भूदलात एक बेसिक वेतन असते. प्रत्येक सैनिकाजवळ असणारे शस्त्र- आपल्या भाषेत बंदूक- असलेल्या बंदुका ३०३ या ४०-५० वर्षे जुन्या. त्या बदलणे आवश्यक. जागा घेणार 'सेल्फ लोडिंग रायफल'. सेन्याचे बेसिक वेतन बदलणे हा फार खर्चिक, वेळ मागणारा, सराव आवश्यक असणारा प्रकार आहे. श्रीमंत राष्ट्रांची सैन्येदेखील २०-२५ वर्षांत एकदा याला हात घालत. सेल्फ लोडिंग रायफल भारतात तयार होत नसे. आयात परवडत नव्हती. ले. ज. अेस. डी. वर्मा या ज्येष्ठ सेनाधिकाऱ्यांनी अशी रायफल विकसित करणे, या प्रक्रियेला चालना दिली, सर्व प्रकारच्या वातावरणात चाचण्या झाल्या. संपूर्ण भारतीय बनावटीची ही रायफल टप्पाटप्याने सार्वजनिक क्षेत्रांतच तयार करून सैन्यात रुळवायला चार वर्षे लागणार होती. कुठलेच परकीय चलन नको होते. हे करताना ज्या ३०३ बंदुका माघारी आल्या असत्या, त्यातल्या ७५-८० टक्के नगांसाठी ब्रह्मदेशाने मागणी नोंदवली होती. उरलेल्या पोलिस व्यवस्थेत व पश्चिम सीमेवर शेतकऱ्यांमध्ये सामावल्या जाणार होत्या. तिन्ही सेनादलांच्या प्रमुखांनी मान्यता दिली. संरक्षणमंत्री मेनन यांच्या अध्यक्षतेखाली बैठक झाली. त्यांनी फाइल ठेवून घेतली, पुढे काहीही केले नाही. १९६२ साली जेव्हा राष्ट्रीय आणीबाणी म्हणून अमेरिकेकडे विमानाने पाठवा अशी तातडीची मागणी करण्यात आली, त्यात पहिल्या क्रमांकावर 'सेल्फ लोडिंग रायफल' होती.

नेहरूंचा मुद्दा चुकीचा नव्हता, पण त्यात दोन गोष्टींकडे दुर्लक्ष होते. एक म्हणजे अशा भारतीयीकरणाची अंमलबजावणी व दुसरे म्हणजे मधल्या काळात प्रश्न निर्माण झाला, तर काय करायचे? यांतला अंमलबजावणी हा मुद्दा आजही पुरेसा दुर्लक्षित आहे. दुसऱ्या प्रश्नाचे स्वरूप पाहायला हवे.

(iv) आपणाला हे विसरण्याची सवय आपले राज्यकर्ते-विचारवंत-पत्रकार या मंडळींनी लावली आहे, की अमेरिका म्हणजे प्रथमपासून भारतविरोधी; फक्त भारतविरोधी नव्हे, तर पाकिस्तानधार्जिणी. त्यामुळे स्वातंत्र्य मिळायच्या आधी पं. नेहरू व्हाइसरॉयच्या मंत्रिमंडळात उपप्रमुख झाले, त्या वेळी अमेरिकेने ब्रिटनचा सल्ला बाजूला सारत तातडीने भारतात आपला राजदूतावास उघडला, काश्मिरप्रश्नी 'सामिलीकरण' हे पूर्णपणे कायदेशीर आहे, हे पूर्णपणे कायदेशीर आहे, हे त्या वेळी (१९४७-४८) अमेरिकेने मान्य केले होते, मात्र काश्मिरबाबत भारतानेच रेखीव, स्पष्ट, व ठाम भूमिका न घेतल्याने अमेरिकेचा रस पुढे आटला. १९५२ सालापासून जनरल जॉर्ज मार्शल यांच्या जागी जॉन फॉस्टर डलेस आल्यावर कम्युनिस्ट रशियाविरोधात जी करारमालिका रचण्यात आली त्यात पाकिस्तान सामील झाला, भारताने नकार दिला. या वातावरणात १९५४ ते १९५८ अशा चार वर्षांत अमेरिकेने विनामूल्य पाकिस्तानच्या सैन्याचे आधुनिकीकरण केले. हे रुळायला १९५८ ते १९६० असा काळ आपण गृहीत धरू. साहजिकच फाळणीवेळी व १९५४ सालापर्यंत एकाच पातळीवर (शस्त्रे, प्रशिक्षण रसद-दारूगोळा पुरवठा) असलेल्या या दोन सेनादलांत पाकिस्तान आधुनिक, तर भारत मागासलेला, असे चित्र तयार झाले. सैन्याचे आधुनिकीकरण टाळले गेले. जर तयारी मागास अवस्थेत असताना युद्ध पेटलेच तर काय? हे नेहरूंच्या विचारधारामांडणीत स्पष्ट नाही. १९६२च्या

पराभवाचे एक मुख्य कारण हे मागासलेपण आहे. मात्र मूलभूत गोष्टींची गरज (कपडे, रसद, अन्न, हलकी शस्त्रे ) यात प्रथम आधुनिक होत, मग वरच्या प्रणालीतल्या शस्त्रनिर्मितीला हात घालणे, शक्य व आवश्यक असेल तिथे खाजगी क्षेत्राची मदत घेणे या मार्गाने न जाता आम्ही सुपरसॉनिक विमाननिर्मितीला हात घातला. पन्नाशीच्या उत्तरार्धात मत्रिमंडळ-नौदल यांना विश्वासात न घेता, प्रश्नाचा सांगोपांग विचार न करता विमानवाहू नौका (विक्रांत) ब्रिटनकडून खरेदी करण्याचा निर्णय पंडित नेहरूंनी ब्रिटनभेटीत एकाएकी चोवीस तासांत घेतला. राष्ट्रे बलाढ्य नौदल उभारतात ते आपल्या व्यापाराच्या संरक्षणासाठी (आयात-निर्यात). या वाढत्या व्यापारातून येणाऱ्या करांमधून नौदलवाढीचा खर्च भागवला जातो. भारताची आर्थिक उभारणी त्या काळात निर्यातीवर आधारलेली नव्हती. मुख्य म्हणजे विमानवाहू नौका हे पल्लेदार पण नाजूक शस्त्र आहे. या प्रकारच्या नौकांना स्वरक्षणासाठी पाणबुड्या (सबमरीन), विनाशिका (डिस्ट्रॉयर), फ्रिगेट्स या व अशा कमीतकमी सोळा निरनिराळ्या स्वरूपांच्या नौकांचा ताफा दिमतीला आवश्यक असतो. तो निर्माण करणे, सुस्थितीत ठेवणे, त्यांचे प्रशिक्षण सराव, माणूसबळ हे सर्व भारताच्या त्या वेळेच्या संरक्षण अर्थपुरवठ्यात बसत नव्हते. तेव्हा सैन्याच्या प्राथमिक मूलभूत गरजा भागवायला पैसा नव्हता, हे अर्धसत्य आहे.

(v) सैन्यदलांच्या पदोन्नतिप्रक्रियेत नको त्या प्रकारचा हस्तक्षेप :

कुठल्याही संस्थेने मोठ्या व मोठ्या भूभागांवर पसरलेल्या संस्थेची रचना श्रेणिबद्ध असते. अर्थात पदोन्नती, त्यासाठी एक सुविहित रचना अनिवार्य असते. इथे सैन्यदळे अपवाद नसतात. १०० टक्के न्याय्य समाधान कुठल्याही व्यवस्थेत अशक्य. पण पूर्वग्रहांचे कंगोरे शक्य तेवढे निकामी करणे, हे या रचनेतले एक महत्त्वाचे तत्त्व आहे. अशी रचना सैन्यदलांमध्येही होती. एका अधिकाऱ्याच्या लगेचच्या वरिष्ठाने वार्षिक अहवाल लिहायचा, त्या वरच्या वरिष्ठाने त्यावर आपले मत लिहायचे (Review), त्यावरच्या अधिकाऱ्याने आणखी एक (Review) म्हणजे पुनर्विलोकन. प्रत्येक श्रेणीत त्या त्या वर्षी दाखल झालेल्या मंडळींचा एक गट करण्यात येतो. अशा गटांची पदोन्नतीसाठी विचार करण्याची वेळ आली म्हणजे त्या त्या सेनादलाचा प्रमुख एक समिती नेमे. समितीत वरिष्ठ श्रेणीतले १२ च्या आसपास अधिकारी असत. समितीतला प्रत्येक अधिकारी स्वतंत्रपणे - एकत्र बसून नव्हे. आपापली पदोन्नतीयोग्य निवडीची यादी तयार करत असे. यासाठी एक गणिती पद्धतही विकसित करण्यात आली होती. समितीतल्या सदस्यांच्या निवडीचे मग सरासरीकरण करण्यात येई. बराच पूर्वग्रह (Bias-हिंदीत 'भाई-भतिजा' ) बाजूला पडे. १९५३ साली शासनाने एकाएकी लेफ्टनंट कर्नल व पुढे असे सर्व पदोन्नत्तीचे अधिकार त्या त्या सेनादलप्रमुखांकडून काढून घेत संरक्षणमंत्र्यांच्या अखत्यारीत आणले. ले. कर्नल, कर्नल, ब्रिगेडियर, मेजर जनरल व लेफ्टनंट जनरल या सर्व पदांवर आता अंतिम निर्णय संरक्षणमंत्र्यांनी घ्यायचा. जनरल- (Five Star) हे पद फक्त भूदलप्रमुखांचे असते. (चीफ ऑफ आर्मी स्टाफ.) नौदल व वायुदल (श्रेणी लिहिणे टाळले आहे.) यांतही हे लागू करण्यात आले. केवळ संख्या लक्षात घेतली, तरी लक्षात येते, की केवळ उपलब्ध वेळ या एकाच निकषावर हे काम करणे संरक्षणमंत्र्यांना शक्य नाही. इथे एक पार्श्वभूमी आवश्यक आहे. सैन्याची बांधणी नेहमी काळाच्या पटावर पसरलेले मोठे युद्ध खेळण्यासाठी करण्यात येते. (त्या काळात भारत-पाकिस्तान-चीन यांच्याकडे अण्वस्त्रे नव्हती.) असे युद्ध भडकले, तर युद्धकाळासाठी सैन्यसंख्या गतीने वाढवावी लागते. अधिकारी-चढत्या श्रेणीत- तयार करणे खर्चिक व वेळ मागणारे असते. तुलनेने 'सैनिक-जवान' प्रशिक्षणकालावधी खूप कमी असतो. म्हणून कुठल्याही खड्या सैन्यामध्ये किमान गरजेपेक्षा खूप मोठ्या प्रमाणात अधिकारीसंख्या जाणीवपूर्वक जास्त ठेवण्यात येते- गरज निर्माण होताच सैन्यतुकड्या वाढवता येतात. संरक्षणमंत्री हा राजकारणात असतो. त्याला पक्षकार्य, दौरे, मतदारसंघ, मंत्रालयातली इतर कामे, संसद असे अनेक व्याप असतात. त्यामुळे इतकी सगळी कागदपत्रे सूक्ष्मपणे पाहून पदोन्नती-निर्णय घेणे, अत्यंत कार्यक्षम मंत्री असला तरी शक्य नाही. वरिष्ठ, त्यावरचा, त्याच्याही वरचा (हे सर्व बदलते) अशा अनुभवी अधिकाऱ्यांच्या काही वर्षांच्या सरासरीकरण

झालेल्या निर्णयापलीकडे 'त्या व्यक्तींविषयी नवी-निराळी अशी काय माहिती संरक्षणमंत्र्यांकडे असणार आहे? परिणामी ही सर्व प्रक्रिया 'बाबू' मंडळींच्या ताब्यात गेली. अगदी कारकुनापासून पुढे. शिवाय 'जिवाजीराव कलमदाने' (संदर्भ : राम गणेश गडकऱ्यांचे 'राज्यसंन्यास' हे अपूर्ण नाटक) यांचेकडे अशा पद्धतीने वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांचा निर्णय बदलण्याचा– तोही कारणे न देता– अधिकार देणे, हे त्या वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांना अपमानास्पद वाटणारच. याहून वाईट परिणाम समजून घ्यायला हवा.

शेवटी सैन्यात अधिकारी–श्रेणी कुठलीही असो– हा माणूसच असतो. ही व्यवस्था सुरू झाल्यावर बाबूला वा राजकारण्यांना भेटणे, वशिला.....हे सर्व सुरू झाले. सैन्य हे राजकारणाबाहेर असावे, या मूलभूत लोकशाहीतत्त्वाची पायमल्ली झाली. उदाहरणे देणे टाळले आहे; पण ज्ञात उदाहरणांमध्ये कागदपत्रांत कारकुनी खाडाखोडींपासून कोर्टात सत्य दडवण्यापर्यंत अनेक प्रकार झाले. याचा परिणाम सैन्याच्या मनोधैर्यावर झाल्याशिवाय कसा राहील.

(vi) नागरी सत्तेची सर्वोच्चता (सुप्रिमसी ऑफ सिव्हिल पॉवर) :

अध्यक्षीय लोकशाही असो वा संसदीय, नागरी सत्ता सर्वोच्च हे मूलभूत तत्त्व आहे. यावर तडजोड कधीही संभवत नाही. साहजिकच ब्रिटिश काळात सरसेनापती (कमांडर-इन-चीफ) याला व्हाइसरॉयच्या काळात जे क्रमांक दोनचे स्थान होते, व्हाइसरॉयच्या मंत्रिमंडळाचे सदस्यत्व त्याला मिळे ते, स्थान तसेच राहणे शक्य नव्हते. याबद्दल सैन्यदलाची तक्रार नव्हती. प्रश्न होता नागरी सत्तेची सर्वोच्चता म्हणजे काय? नागरी सत्तेने राष्ट्रापुढे कुठले संकट आहे- येण्याची शक्यता आहे, याचा अंदाज घ्यायचा असतो. याला उत्तर राजनैतिक मार्गाने, तडजोड करून, पडते घेऊन, तह करून....मार्ग पुष्कळ. एक मार्ग युद्धाने प्रश्न सोडवणे शक्य आहे, की आपण वाटाघाटी-तडजोड या मार्गांनी जाणे उचित असे मानत असलो, तरी समोरचा देश जर युद्धानेच प्रश्न सोडवू पाहत असेल तर? मग युद्ध अटळ ठरू शकते. युद्ध करायचे का नाही हा अधिकार, नागरी सत्तेचा आहे. जर करायचे तर ते आर-या-पार' का काही बंधने पाळून, हाही अधिकार नागरी सत्तेचा आहे. हे निर्णय घेताना सेनेची पुरेशी तयारी करण्याची जबाबदारीही नागरी सत्तेचीच आहे. एकदा युद्ध हा पर्याय अपरिहार्य ठरल्यावर सेनेला युद्धउद्दिष्ट, मर्यादा याच्या स्पष्ट सूचना लेखी द्याव्या लागतात. एकदा त्या दिल्या म्हणजे युद्धामागे सर्व राष्ट्राची शक्ती उभी करण्याची जबाबदारी नागरी सत्तेची असते. सैन्याच्या कुठल्या तुकडीने कुठे लढायचे, एखाद्या सैन्यतुकडीचे नेतृत्व कुणाकडे, अशा रोजच्या सैन्यव्यवहारात हस्तक्षेप करायचा नसतो. ही पथ्ये, या मर्यादा १९४७-४८ मध्ये काश्मिर असो व १९६२ चे चीन सीमायुद्ध असो, भारताच्या नागरी नेतृत्वाने पाळल्या नाहीत. १९५१ साली पहिले भारतीय सरसेनापती जनरल करिअप्पा यांनी नेफामध्ये (आज अरुणाचल प्रदेश) चीनबरोबर तणातणी उद्भवली; तर संभाव्य उपायांच्या चर्चेसाठी प्रधानमंत्र्यांची भेट घेतली. 'तुम्हाला तिकडे लक्ष देण्याची गरज नाही, तुम्ही फक्त पाकिस्तानची काळजी करा', असे उत्तर नेहरूंनी दिले आहे. चीनसोबत सशस्त्र संघर्ष टाळायचा, हे राजकीय धोरण ठरवण्याचा प्रधानमंत्र्यांचा अधिकार नागरी सत्तेच्या सर्वोच्चतेत बसतो; मात्र आपल्या सरसेनापतीचे म्हणणे ऐकूनही न घेणे कुठे बसवायचे? लोकशाही पचवलेल्या राष्ट्रात नागरी सत्तेची सर्वोच्चता कशी असते, याचे एक उदाहरण ब्रिटन-फ्रान्स यांच्या संदर्भात आहे. विसाव्या शतकात दोन्ही महायुद्धांत ब्रिटन व फ्रान्स मित्रराष्ट्रे राहिली; पण त्याआधी त्यांची अनेकदा युद्धे झालेली आहेत. अशा युद्धांच्या वेळी युरोपच्या भूमीवर असलेल्या ब्रिटिश सेनेच्या सरसेनापतीला युद्धधोरण काय, हे स्पष्टपणे व तेही लेखी स्वरूपात सांगितलेले आहे. 'एक राष्ट्र म्हणून फ्रान्स संपवणे, हा उद्देश नाही. युरोपात एकमेव महासत्ता म्हणून फ्रान्स उभा राहणार नाही, या प्रमाणातच फ्रान्सची हानी मर्यादित ठेवायची आहे.' स्वतंत्र भारताच्या इतिहासात शास्त्री-यशवंतराव पाकिस्तान युद्ध, इंदिरा गांधी- बांगलादेश युद्ध व अटलबिहारी वाजपेयी- कारगिल युद्ध यांत ही पथ्ये पाळली गेली. १९४७-४८ काश्मिर व १९६२ चीन यात प्रश्नचिन्हे बरीच आहेत. (प्रत्यक्ष युद्धातले कौशल्य, हालचाली वगैरे निराळे. ती चर्चा इथ प्रस्तुत नाही.)








(vii) सेनादलातल्या पदोन्नतीमध्ये नको त्या पद्धतीने हस्तक्षेप ('नाक खुपसणे' संसदीय आहे का?') व नागरी सत्ता सर्वोच्च या वादातील तत्त्वाचा आसरा घेत गैरवापर यामुळे जनरल थिमय्या यांच्या राजीनाम्याचे प्रकरण उद्‌भवले. श्री. कृष्ण मेनन यांची अहंकारी, अपमानास्पद वागणूक हे एक जास्तीचे कारण. भडका पेटला तो श्री. ब्रिजमोहन कौल या सेनाधिकाऱ्याला सहा वरिष्ठांना डावलून देण्यात आलेली पदोन्नती. थिम्मय्यांचा या पदोन्नतीला योग्य कारणांसाठी विरोध होता.

हे कौलप्रकरण फार अचंबित करणारे आहे. एका चुकीच्या माणसाला मर्यादेबाहेर कृपादृष्टी दाखवत पुढे आणणे, त्यासाठी रोजव्यवहारात ढवळाढवळ करणे, कार्यक्षम व सुयोग्य अधिकाऱ्यांना डावलणे- निवृत्त होण्यास भाग पाडणे, सैन्यशिस्त उधळली जाणे, अशा सर्व गोष्टी या कौलमहाशयांशी संबंधित आहेत. हे सर्व कशासाठी तर यांना सरसेनापती करायचे, हा पंडित नेहरूंचा हट्ट. या हट्टापायी नेहरूंनी लोकसभेची दिशाभूलही केली आहे.

श्री. कौल हे स्वातंत्र्य मिळण्यापूर्वी ब्रिटिश-भारतीय सेनेतले अधिकारी. ब्रिटनमध्ये सैनिकी प्रशिक्षण घेतलेले. भारतात परतल्यावर मात्र त्यांनी सैन्याच्या लढाऊ पथकांमधून रसदपुरवठा करण्याऱ्या क्षेत्रात बदली मागून घेतली. खरेतर जरी रसदपुरवठा संघटना हेही महत्त्वाचे क्षेत्र असले, तरी सैन्यात जे महत्त्व लढणाऱ्या विभागांना (पायदळ, तोफखाना, चिलखती दल-इन्फन्ट्री, आर्टिलरी, आर्मर) असते, ते महत्त्व वाहतूक-रसद-पुरवठा-दुरुस्ती यांत काम करणाऱ्यांना नसते. दुसऱ्या महायुद्धात मध्यपूर्व आणि ब्रह्मदेश आघाडीवर भारतीय सेना कौशल्याने, शर्थीने लढली. जे प्रशिक्षणकाळात शिकवले गेले त्याचा अनुभवातून पडताळा अशा प्रसंगी घेतला जातो, माणसे पुढच्या जबाबदारीसाठी तयार होतात. भारताचे पुढे गाजलेले सेनापती करिअप्पा, माणेकशॉ, थिमय्या, थोरात, गुरुनाथ बेवूर....हे त्या युद्धात तावूनसुलाखून निघालेले. ही संधी कौल यांनाही होती, पण त्यांनी टाळली. महायुद्ध संपल्यावर स्वातंत्र्याच्या वाटाघाटी सुरू असताना नेताजींच्या आझाद हिंद सेनेच्या अधिकाऱ्यांवर खटले भरले गेले, बचावाची जबाबदारी काँग्रेसने घेतली. (श्री. भुलाभाई देसाई यांचे विख्यात 'बंड करण्याचा अधिकार- राइट टू रिबेलियन' हे बचावाचे भाषण.) या वेळी कौल सैन्य-मुख्यालयात होते. त्यांनी तिथली एक गुप्त फाईल चोरून पंडित नेहरूंना दाखवण्यासाठी गुप्तपणे आणली-खटल्यासंबंधी. तसे त्यांचे नेहरूंशी दूरचे नातेही होते. कौल हुशार, चलाख, तरतरीत होते. अशी फाईल आणणे हा सैन्यशिस्तीचा द्रोह होता. ते बाजूला सारून स्वातंत्र्यानंतर नेहरूंनी त्यांना सरळ अमेरिकेला राजदूतावासात मिलिटरी अटॅची म्हणून पाठवले. तिथून काश्मिरमध्ये अर्धसैनिक दल उभारण्यासाठी, तिथे शेख अब्दुल्लांशी मतभेद. मग कोरियात थिमय्यांचे दुय्यम म्हणून. तिथे मतभेदांमुळे राजिनामा. राजीनामा न स्वीकारता त्यांना सुटीवर भारतात रवाना करण्यात आहे. १९५३ साली शेख अब्दुल्लांना अटक झाली तेव्हा नेहरूंचे खास प्रतिनिधी म्हणून पुन्हा कौलच. हिंदी-चिनी भाईभाई या स्वप्नरंजनकाळात त्यांना चीनभेटीसाठी पाठवले गेले. १९६१ साली गोवामुक्तीच्या वेळी कौल 'चीफ ऑफ जनरल स्टाफ' होते. (सेना मुख्यालयातले हे पद पुढे रद्द करण्यात आले.) ही मोहीम भूदळाच्या दक्षिण विभागाच्या एका भागाची होती. मात्र कौल गोव्यात शिरणाऱ्या पहिल्या तुकडीसोबत होतेच. नेहरूंसोबतच्या जवळिकीमुळे आलेला अहंकार इतका वाढला होता, की सैन्य मुख्यालयात एका बैठकीची अध्यक्षता सरसेनापती करत असताना, कौल दहा मिनिटे उशिराने आले; खेद व्यक्त करणे बाजूलाच पण काही काळाने 'मला दुसरे महत्त्वाचे काम आहे', असे जाहीर करत बैठक संपण्याआधी, परवानगी न मागता उठूनही गेले. तपशील पुष्कळच देता येईल. सार एव्हढेच की सैन्यात आवश्यक- अंगभूत असलेली शिस्त अधिकाऱ्याला अवाजवी जवळीक व नियमबाह्य बढती यांमुळे ढासळली होती.

या कौल यांना नियमबाह्य बढती देण्याच्या प्रकारातून, कृष्ण मेनन यांच्या अधिक्षेपपूर्ण वागण्यामुळे, संरक्षण-व्यवस्थेकडे होत असलेल्या दुर्लक्षामुळे साचत आलेला जनरल थिम्मय्या यांचा क्षोभ अनावर होत त्यांनी राजीनामा दिला व माहिती वर्तमानपत्रांत आली. नेहरूंनी थिम्मय्यांना भेटीला बोलावून 'मी मेननना सांगतो, यापुढे ते नीट वागतील', असे सांगून राजीनामा परत घ्यायला लावला;

मात्र दुसऱ्या दिवशी लोकसभेत मूळ प्रकरण बाजूला सारत नागरी सत्तेची सर्वोच्चता यावर एक प्रवचन दिले.

थिम्मय्यांसारखा माणूस निवृत्त झाल्यावर त्यांना राज्यपाल-राजदूत असे कुठलेही काम सन्मानपूर्वक न देता मोडीत काढले गेले. हा राष्ट्रनिष्ठ निष्णात सेनानी संयुक्त राष्ट्र संघटनेने सायप्रसमध्ये शांतिकार्यासाठी आवर्जून बोलावला. तिकडेच त्यांचा अंत झाला. सेल्फ लोडिंग रायफल विकसित करणारे ले. ज. एस. डी. वर्मा यांनी सेनादलप्रमुखांना लडाखमध्ये सैन्यतयारी सुधारली असल्याचे नेहरूंचे लोकसभेतले निवेदन वस्तुस्थिति दर्शक नाही, असे कळवले व पत्र परत घ्या, अशा दबावाला नकार दिला. त्यांना बढती नाकारली गेली, त्यांनी लगेच निवृत्ती स्वीकारली. त्यांची पेन्शन अकारण रोखत त्यांच्यावर 'कोर्ट मार्शल' चे हत्यार उपसण्याच्या वंदता पसरवण्यात आल्या. या सैनानीला भारत सोडून ब्रिटनमध्ये निघून जावे लागले, तिकडेच त्यांचा देहान्त झाला. चीनचा हल्ला (नेफा) कशा पद्धतीने होईल, कुठल्या खिंडी ते वापरतील, वेळापत्रक काय असेल, हे रेखीव अभ्यास-विश्लेषणाद्वारे स्पष्टपणे मांडणाऱ्या व यावर नीट विचार व कृती हवी असा आग्रह धरणाऱ्या शंकरराव थोरातांसारख्या सेनानीचा हक्क व लायकी असतानाही त्यांना चीफ ऑफ आर्मी स्टाफचे पद नाकारण्यात आले. थोरातांनी निवृत्ती घेतली. केंद्रीय मंत्रिमंडळातल्या एका मंत्र्याने थोरातांना एका राष्ट्रीयीकृत मोठ्या प्रकल्पाचे अध्यक्षपद स्वीकारण्याची विनंती केली. थोरातांनी मान्यता दिली, पण प्रधानमंत्र्यांनी नकार दिला. सैन्याचे मनोधैर्य? किस खेत की मूली?

या झाल्या अडचणी. आता अनुकूलता.

१) सर्वात पहिला मुद्दा यशवंतरावांचं व्यक्तिमत्त्व द्वैभाषिक मुंबई राज्याचे (गुजराथ + महाराष्ट्र) पहिले मुख्यमंत्री, तेव्हा वय ४१ वर्षे. त्यांच्या राजकारणाविषयी मतभेद असणारे आहेतही; पण स्वच्छ चारित्र्य, आर्जवी स्वभाव, प्रशासनावर पकड, कुणाचा जाणीवपूर्वक अपमान करणे हे मुळातच नाही. या बाजूविषयी यशवंतरावांशी मतभेद वा शत्रुत्व असलेल्यांनीही विरोधी मत दिलेले नाही. ज्या पार्श्वभूमीवर ते संरक्षणमंत्रिपद स्वीकारत होते, त्या परिस्थितीत हे सर्व गुण त्यांना फार उपयोगी ठरणार हे स्पष्ट होते. स्वच्छ चारित्र्य हा उल्लेख मुद्दाम केला आहे. कारण कृष्ण मेनन हे संरक्षणमंत्री होण्याआधी ब्रिटनमध्ये राजदूत होते. त्या वेळी एकदा सैन्यदलांसाठी स्कॉच व्हिस्की खरेदी व दोन वेळा जीप खरेदी असे घोटाळे त्यांच्या खाती जमा आहेत, ज्यांची चौकशी नेहरूंनी होऊ दिली नाही.

२) अर्थकारण : स्वातंत्र्यापासून संरक्षणखर्च गोठवणे, कमी करणे, सैन्यसंख्या कमी करणे वगैरे १९६२ पर्यंत सुरू होते. मुरारजी देसाई अर्थमंत्री असताना त्यांनी संरक्षणखात्याच्या मागण्या मान्य केल्या नाहीत, हा आरोप खरा नाही. मेनन मागण्याच नीट पुढे ठेवत नव्हते. विरोधी पक्षही अभ्यास न करता होत्या त्या तुटपुंज्या तरतुदींवरही अर्थसंकल्पावरील चर्चेत 'कमी करा' असा टाहो फोडत असे. आता सेनादलांची मागणी- दुर्लक्ष, उडवून लावणे, अशा मार्गाने नकार हे शक्य नव्हते. (१९६२ नंतर नेहरूंनीच संसदेत आम्ही फारतर मागणीच्या -आधुनिकीकरण- दहा टक्के रक्कम मंजूर करत होतो, अशी प्रामाणिक कबुली दिली आहे.) आता एक तातडीचे व एक योजनाबद्ध अशा मार्गाने आधुनिकीकरण व विस्तार साधणे आवश्यक होते. यासाठी जो पैसा लागेल, त्याच्या आड येणे आता कुणालाच परवडणारे नव्हते.

३) महाराष्ट्राच्या भागात यशवंतराव घडले (जुना सातारा जिल्हा). इथून सैन्यभरतीची परंपरा फार जुनी आहे, जी ब्रिटनने भारतीय 'आर्मी' उभारली त्या काळातही सुरू राहिली - आजही मजबूत आहे. तेव्हा एका लढवय्या परंपरा असलेल्या भागातून आलेल्या संरक्षणमंत्र्याविषयी, स्वातंत्र्ययुद्धात भूमिगत राहून लढलेल्या व्यक्तीविषयी सैन्य-अधिकारी जवान यांना एक जवळीक, एक आपुलकी वाटणे स्वाभाविक होते. याचा फायदा अविश्वासाचे मळभ हटवण्यास खूप उपयोगी ठरला.

४) अभ्यासू वृत्ती : त्या क्षेत्रातले तज्ज्ञ, ग्रंथ यांच्या साहाय्याने प्रश्नांचा नीट तपशिलात जाऊन अभ्यास करणे, हा त्यांचा स्वभाव नव्या क्षेत्रात रुळण्यासाठी खूप उपयोगी होता. आज त्यांची ग्रंथसंपदा पाहणाऱ्यांना याचा सहज प्रत्यय येतो.

५) वय-उत्साह : संरक्षणमंत्री होतेवेळी यशवंतरावांनी अजून पन्नाशी ओलांडली नव्हती. त्यांचे










शरीर मजबूत होते, उत्साहही भरपूर. तेव्हा प्रवास, भेटीगाठी, कागदपत्रे व संसद अशा सर्व आघाड्यांवर यशस्वी होण्यासाठी त्यांची 'एनर्जी' त्यांना पुरेशी साथ देणार होती.

६) एक मुद्दा पुरेसा चर्चेत येत नाही. या सर्व 'चीन' प्रकरणात १९४६ ते १९६२ या काळात पंडित नेहरूंनी योग्य जागी योग्य माणसे न नेमणे (संरक्षणमंत्रीकाही वरिष्ठ सेनाधिकारी) इथपासून अनेक चुका– दुर्लक्ष-वास्तव नाकारणे, हे सर्व केले. त्यामुळे '१९६२' च्या मानहानीचे खरे हक्कदार नेहरू. सर्व जरी खरे असले, तरी एका गोष्टीकडे लक्ष असलेच पाहिजे. स्वातंत्र्याआधी व नंतर राष्ट्र स्वातंत्र्याच्या मार्गावर नेणे व राष्ट्रउभारणी या दोन्ही आघाड्यांवर एक सरदार पटेल यांचा अपवाद सोडला, तर पंडित नेहरूंइतके योगदान कुणाचेच नाही. त्यांच्या बहुविध व्यक्तिमत्त्वाचे आकर्षण पक्षाच्या चौकटीत सामावणारे नव्हते. तो जनतेचा 'जवाहर' होता. राष्ट्राने त्यांचे हे सर्व 'घडवणे' कृतज्ञपणे मान्यही केले, आजही ती भावना टिकून आहे. '१९६२' मुळे राष्ट्राच्या आत्मविश्वासालाच फक्त धक्का बसला असे नव्हे, तर नेहरूंच्या मनाची सर्व उभारी खचली. त्या वयात याचा शरिरावर परिणाम होणे स्वाभाविक होते. मात्र या गर्तेतून भारतासारख्या विभूतिपूजक राष्ट्राला सावरण्याची, पुन्हा वाटचालीला सुरुवात करून देण्याची कुवत, प्रतिभा त्यांच्याकडेच होती. १९६३ व १९६४ (अर्धा) या काळात नेहरू पाठराखण करीत आहेत, ही वस्तुस्थिती यशवंतरावांच्या कार्यक्षमतेमध्ये वाढ करणारी होती.

सुरुवातीच्या अडखळत्या पावलांनंतर यशवंतरावांनी दमदार पावले टाकली. १९६४ मध्ये त्यांनी संरक्षण व्यवस्थेच्या आधुनिकिकरणाची एक पंचवार्षिक योजना आखली. ही आखण्यात सैन्यदलांचे सहकार्य मिळवले. पाश्चात्त्य राष्ट्रांनी प्रत्यक्ष युद्ध सुरू असताना शस्त्र-पुरवठ्याबाबतची आस्था व तत्परता दाखवली, ती आटत गेली. विकत मागत असूनही पाहिजे त्या प्रमाणात मिळणे शक्य नव्हते. भारत खचला आहे, ही संधी साधून काश्मिरबाबत दबाव वाढवला. भारताला रशिया व पूर्व युरोपकडे वळणे भाग पडले. मात्र यात एक मोठा अडथळा मध्येच उभा राहिला.

मे ६४ मध्ये नेहरूंचे निधन झाल्यावर शास्त्री प्रधानमंत्री झाले. १९६२ चा पराभव हा भारतीय सैन्य मानसिक पातळीवरच दुबळे आहे, शास्त्री हे सशासारखे भित्रे असणार, आपली शस्त्रे भारतापेक्षा जास्त आधुनिक आहेत, अशा विचारमालिकेतून काश्मिर घेण्याचा बेत पाकिस्तानने रचला. तिथेही काही सेनाधिकाऱ्यांनी विरोध केला होता, पण अयुब-भुत्तो यांचा साहसवाद प्रभावी ठरला. प्रथम कच्छ १९६४ व १९६५ मध्ये युद्ध पेटले.

काश्मिरमध्ये घुसखोर पाठवत (१९४७-४८ पुनरावृत्ती) तिथे दंगल उघडवायची, तर दुसरीकडे भारतातून 'पूंछ' व श्रीनगर इकडे जाणारे रस्ते ताब्यात घेत काश्मिर-लडाखची रसद तोडायची, असा हा डाव होता. छांब-जोरिया भागात जेव्हा दबाव खूपच वाढला, त्या वेळी विमानदलाचा वापर एकीकडे करत दुसरीकडे आंतरराष्ट्रीय सीमा ओलांडून लाहोरच्या दिशेने भारतीय सेनेने आक्रमण केले. या '१९६५' बद्दल काही गैरसमज आहेत.

भारतीय सैन्याने लाहोरच्या दिशेला धडक मारणे, हे आंतरराष्ट्रीय पातळीवरच्या गुंतागुंतीत धाडसी पाऊल आहे. काश्मिर-भारत संपर्क तोडणे (क्षेत्र छांब-जोरिया), हे काश्मिरच्या सीमेत मोडते. इथे आंतरराष्ट्रीय उभयपक्षी मान्य सीमा नसून 'युद्धबंदीरेषा' (१९७१ पासून प्रत्यक्ष ताबा रेषा) होती. काश्मिर हा वादग्रस्त भाग पाकिस्तान मानत असल्याने युद्धबंदी रेषा आपण ओलांडली, तरी युद्ध १९४८ प्रमाणे जम्मू-काश्मिर भागातच मर्यादित राहील, शास्त्रींसारखा माणूस आंतरराष्ट्रीय सीमा ओलांडणे (लाहोर धडक) असे साहस पतकरण्याचे टाळेल, असे गणितात होते. लाहोर ताब्यात घेणे, हा युद्धउद्देश नव्हता. लाहोरकडे फौजा गेल्या ते अंतर भारतीय सीमेपासून फारतर १२-१३ मैल आहे. लाहोरला संरक्षण म्हणून त्या शहराच्या पूर्वेला (भारताच्या दिशेला) इच्छोगिल या नावाचा कालवा पाकिस्तानने बांधला आहे. (रणगाड्यांना मोठा अडथळा. राजस्थानच्या प्रदेशात भाक्राच्या पाण्याच्या उपयोगी जो 'राजस्थान कॅनॉल' बांधला गेला, त्याचा नकाशा पाहिला म्हणजे त्याचा रणगाड्यांना मोठा अडथळा, हा उद्देशही स्पष्ट होतो.) जरी भुत्तो-अयुब जोडीला भारत आंतरराष्ट्रीय सीमा ओलांडणार नाही, असे वाटत असले तरी पंजाबचे तत्कालीन राज्यपाल आणि पाकिस्तानचे

भूदलप्रमुख या दोघांना तसे वाटत नव्हते. त्यामुळे त्यांनी सीमासंरक्षणासाठी सेनातुकड्या पसरून ठेवल्या होत्या. या तुकड्या कुठे आहेत, संख्या, शस्त्रे, पळवाटा कुठे, ही सर्व माहिती भारतीय सैन्याला त्या भागात रोजचा वावर असलेल्या स्मगलर्सनी दिली, स्वतः सोबत गेले. इच्छोगिल कालव्याशी पोचल्यावर परत तिथला एक पूल भारताच्या ताब्यात आला, जो ओलांडून सैन्य लाहोरच्या एका उपनगरात पोचले. (बाटानगर इथे बाटा कंपनीच्या बुटांचा कारखाना होता.) मात्र या तुकडीला रसद व मनुष्यबळ यांचा पुरवठा करण्यात वरिष्ठ सेनाधिकारी अकार्यक्षम ठरले. जर पुरवठा झाला असता, तर एका फार मोठ्या विजयाची शक्यता होती. (राजधानी रावळपिंडी-इस्लामाबाद फार दूर नव्हती.) असो. खेमकरण (असल उतर हे गाव-याचा मराठी उच्चार अस्सल-उत्तर असा सार्थ आहे व तोच त्या स्थानिक बोलीत अभिप्रेत आहे- तिथे जोडक्षर नसते.) इथे पॅटन रणगाडे मोठ्या संख्येने (५०) नष्ट करण्यात यश आले. त्याचे मुख्य कारण त्या अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करण्यात पाकिस्तानी चिलखती दल कमी पडले. तीच कथा सॅब्रे-जेट लढाऊ विमानांची. हे युद्ध ना पाकिस्तानने जिंकले ना भारताने. ज्या वेळी युद्धतहकुबीसाठी आंतरराष्ट्रीय दबाव वाढला, त्या वेळी शास्त्री आणखी ६-७ दिवस युद्ध लांबवले, तर मोठा विजय मिळवाल का, अशी चाचपणी करत होते. मात्र भूदलप्रमुख तयार नव्हते. सैन्यांतर्गत माहितीचे स्रोत नीट नव्हते. आपला ७५-८० टक्के दारूगोळा वापरला गेला; उरलेल्या २० टक्क्यांवर आधारून मोठा विजय शक्य नाही, असे मत भूदल- प्रमुखांनी दिले. पुढे हे स्पष्ट झाले, की ७५-८० टक्के दारूगोळा पाकिस्तान खर्च करून बसले होते, भारताचा ७५-८० टक्के साठा शिल्लक होता. जर माहितीचे स्रोत नीट असते; माणेकशॉ, थोरात, थिमय्या या अशांपैकी कुणी सेनापती असते, तर १९६५ सालीच १९७१ घडले असते. १९६३ पासून सुरू केलेले आधुनिकीकरण पूर्ण होऊन रुळायला ५-६ वर्षे आवश्यक होती. ते कार्य १९७० ला पूर्ण झाले म्हणून १९७१ ला बांगलादेशवेळी मोठा विजय शक्य झाला. या पुनर्बांधणीची आखणी, नियोजन, सुरुवातीची अंमल-बजावणी, शासन-सेनेत विश्वासाचे वातावरण हे सर्व घडवण्यात मोठा वाटा यशवंतरावांचा आहे. त्यांच्या सर्व शक्ती त्यांना उपयोगी पडल्या. दिल्लीमुक्कामात त्यांनी जी जबाबदारी पेलली, त्या १९६३ ते १९७७ या काळातले संरक्षणमंत्री हा काळ सर्वोत्तम आहे.

लेखकाच्या सुदैवाने त्याला बऱ्याचदा यशवंतरावांना भेटण्या-बोलण्याचे प्रसंग लाभले. त्यांच्या जन्मशताब्दी वर्षात त्या आठवणी जाग्या होणारच. राजकारणात कृतज्ञता असा शब्द नसतो. मात्र आपण जनसामान्य या पहाडासारख्या माणसाविषयी कृतज्ञता वाटावी, असे खूपच आहे.





अनुक्रमणिका








# यशवंतराव चव्हाण आणि राष्ट्रीय आणीबाणी

डॉ. अंकुश बालाजी सावंत

महाराष्ट्र राज्याचे पहिले मुख्यमंत्री झाल्यापासून (१९६०) ते श्रीमती इंदिरा गांधी यांनी राष्ट्रीय आणीबाणी घोषित करेपर्यंत (जून १९७५) यशवंतराव चव्हाण यांच्या कार्य आणि कर्तृत्वाचा आलेख सारखा वरवर चढतच राहिला. महाराष्ट्र राज्याचे पहिले मुख्यमंत्री म्हणून त्यांनी खऱ्या अर्थाने लोकशाही पुरोगामी आधुनिक विकसनशील महाराष्ट्राच्या प्रगतीची बीजे रोवली. या संदर्भात त्यांनी केलेले कार्य सर्वश्रुत आहे. लोकशाहीला अभिप्रेत असलेले सर्वसमावेशक राजकारण त्यांनी केले. राज्य मराठीचे की मराठ्यांचे या प्रश्नाचे उत्तर राज्य मराठीचेच असणार, असे स्पष्ट करून त्यांनी चिंतातुर जंतूंना शांत केले. महाराष्ट्राच्या सामाजिक, आर्थिक व औद्योगिक विकासाचा पाया रचतेवेळी त्यांनी मराठी भाषेच्या विकासाकडेही लक्ष दिले. सत्तेचे विकेंद्रीकरण करण्याच्या दृष्टीने त्यांनी पावले उचलली. लोकशाही संस्थांचे पावित्र्य राखले, त्यात निर्माण झालेली कोंडी सोडविण्यासाठी मुख्यमंत्रिपदाची झूल अंगावर असूनही हा नेता सरळ विरोधी पक्षाच्या दालनात गेला व लोकशाहीमध्ये विरोधी पक्षाशी कसे वागावे, याचा वस्तुपाठ घालून दिला. त्यामुळे आधुनिक महाराष्ट्राचे शिल्पकार हे बिरुद यशवंतराव चव्हाणांना शोभणारे आहे.

महाराष्ट्राच्या आघाडीवर यशवंतराव चव्हाणांचे सर्वकाही व्यवस्थित चालले असताना, ऑक्टोबर १९६२ साली चीनने भारतावर आक्रमण करून हिमालयाला रक्तबंबाळ केलं. देशभर संतापाची एकच लाट उसळली. संरक्षणमंत्री कृष्ण मेनन यांच्या राजीनाम्याच्या मागणीने जोर धरला. पंडित नेहरू नरो वा कुंजरोवा करीत बसले. पण लवकरच त्यांच्या ध्यानात आले, की कृष्ण मेनन यांचा राजीनामा घेतला नाही, तर तक्षकाय स्वाहा प्रमाणे लोक इंद्राय स्वाहा म्हणायला मागेपुढे पाहणार नाहीत; नव्हे, शनिवारवाड्यावरून भाषा करतेवेळी काकासाहेब गाडगिळांनी तसे स्पष्ट संकेत दिले होते. शेवटी पंडित नेहरूंनी कृष्ण मेनन यांचा राजीनामा घेतला. माणसांची उत्तम जाण असलेल्या नेहरूंची नजर चव्हाणांवर गेली व त्यांनी चव्हाणांना संरक्षणमंत्री म्हणून बोलवून घेतले.

राष्ट्रीय स्तरावर जाऊन काम करावयाची त्यांची त्यावेळी मानसिकता नव्हती आणि दिल्ली ही तर कट-कारस्थानाची भूमी ! पण स्वत:च्या कर्तृत्वावरील विश्वास व पंडित नेहरूंच्या पाठिंब्याची खात्री असल्यामुळे "हिमालयाच्या रक्षणासाठी सह्याद्री धावून गेला." संरक्षणमंत्रिपदासाठी अनेक दावेदार होते. ते पद आपणास मिळावे, अशी अनेकांची इच्छा होती. पण कोणासही कसलाही हासभास नसतेवेळी नेहरूंनी ते चव्हाणांना दिल्यामुळे हे लोक दुखविले गेले. नेहरूंचे ते फारकाही वाकडे करू शकले नाही. पण चव्हाणांच्या मार्गात अडचणी निर्माण करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. चिनी आक्रमणामुळे नेहरूंचे वलय काही प्रमाणात निस्तेज झाले होते व त्याचा फायदा ही मंडळी घेत होती. आपण दिल्लीला नवीन आहोत व जपून पावले उचलली पाहिजेत, याची यशवंतरावांना जाणीव होती. त्यांनी आपल्या खात्यावर लक्ष केंद्रित केले. दुर्गम भागांना भेट देऊन सैनिकांचे मनोबल वाढविणे, त्यांना आधुनिक शस्त्रांचा पुरवठा करणे, परकीय सत्तांकडून ती मिळविणे, देशात त्याची निर्मिती करण्याच्या दृष्टीने पावले उचलविणे, अशा अनेक बाबींवर त्यांनी लक्ष केंद्रित केले आणि म्हणून दोन वर्षांनी ते आत्मविश्वासाने लोकसभेला सांगू शकले, गेल्या "दोन वर्षांत आम्ही गाजावाजा न करता चांगली तयारी केली आहे." आणि त्याचा प्रत्यय १९६५ च्या भारत-पाक युद्धात आला. भारतीय सैन्याने १९६२ चे अपयश काही प्रमाणात धुऊन काढले व संरक्षणमंत्री म्हणून यशवंतरावांचाही गौरव झाला.

संरक्षणखात्यात चव्हाणसाहेबांचे सर्वकाही व्यवस्थित चालले असताना, गृहमंत्री गुरझारिलाल नंदा यांनी

अनुक्रमणिका

कम्युनिस्टाविरुद्ध योजलेले दडपशाहीचे उपाय, साधूंच्या निदर्शनांवर केलेला अश्रुधूर व गोळीबार, विद्यार्थ्यांचा मोर्चा इत्यादींमुळे गृहमंत्री बदलणे आवश्यक झाले होते. पंतप्रधान श्रीमती गांधी यांनी त्या पदासाठी यशवंतराव चव्हाण यांची निवड केली व अशा प्रकारे यशवंतराव चव्हाण हे नोव्हेंबर १९६६ मध्ये देशाचे गृहमंत्री झाले. साधूंच्या आंदोलनाने निर्माण केलेली परिस्थिती, विद्यार्थ्यांचे आंदोलन, अकाली दलाची मागणी, संत फतेहासिंग यांचे उपोषण अशा अनेक जटिल समस्यांचा त्यांनी सामना केला व आपल्या कौशल्याने मार्ग काढला. त्यापुढे मॅन ऑफ क्रायसेस ही त्यांची नवी ओळख झाली.

१९७० मध्ये त्याची गृहमंत्रिपदावरून उचलबांगडी करण्यात आली व त्यांना अर्थखाते दिले गेले; पण अर्थमंत्री म्हणून त्यांचे अधिकार मर्यादित केले गेले. चार वर्षांच्या अर्थमंत्रिपदानंतर ऑक्टोबर १९७४ मध्ये परराष्ट्रमंत्री म्हणून त्यांची नियुक्ती करण्यात आली. ते त्या पदावर आणीबाणी संपेपर्यंत होते.

पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांनी देशात ज्या प्रकारे आणीबाणी आणली व लादली, त्याला संसदीय इतिहासात तोड नाही. आपल्या मंत्रिमंडळातील सहकाऱ्यांना विश्वासात न घेता आपल्या होयबांच्या पाठिंब्याने सर्व तयारी पूर्ण करून २५ जून १९७२ रोजी आणीबाणीच्या आदेशावर राष्ट्रपतींची रात्री ११.४५ वाजता सही घेऊन सर्व उपाययोजना सुरू झाल्यावर श्रीमती इंदिरा गांधींनी २६ जून १९७५ रोजी सकाळी ६.३० वाजता मंत्रिमंडळाची बैठक बोलविली आणि सहकाऱ्यांना ती बातमी कळविली. सहकाऱ्यांच्या सहमतीस काही अर्थच नव्हता. पण ज्येष्ठ मंत्री व पंतप्रधानपदाचे दावेदार यशवंतराव चव्हाण व जगजीवनराम यांनीतरी विरोध करावा, अशी (लोकांची) अपेक्षा. पण तसे काही झाले नाही. स्वातंत्र्यासाठी भूमिगत चळवळीमध्ये हिरिरीने भाग घेणारा, गांधींच्या सत्याग्रहाच्या चळवळीत भाग घेऊन तुरुंगवास भोगलेला, लोकशाही मूल्यांवर निष्ठा असणारा, सर्वसामान्यांच्या हितासाठी झगडणारा, भारतीय घटनेचा (व बाबासाहेबांचा) सदोदित जप करणारा हा नेता भारतीय घटनेने आपल्या नागरिकाला दिलेले मूलभूत अधिकार काढून घेतले जातात व देश हुकूमशाहीच्या करार दाढेखाली चिरडला जाण[illegible]. याची जाणीव असूनही शांत राहतोच कसा? या प्रश्नाच्या उत्तरात यशवंतराव व आणीबाणी हा विषय समावलेला आहे.

यशवंतराव चव्हाणांच्या या भूमिकेचे विश्लेषण करण्याचा अनेकांनी आपापल्या परीने प्रयत्न केला आहे. कारणमीमांसा केली आहे. यशवंतराव चव्हाणांचे पट्टशिष्य व मानसपुत्र म्हणून ओळखले जाणारे श्री. शरद पवार सांगतात, "इंदिरा गांधींचा आणीबाणी लादण्याचा निर्णय यशवंतरावांना अजिबात भावला नाही, पसंत पडला नाही, रुचला नाही. लोकशाहीवर त्यांची निष्ठा होती. व्यक्तीचे स्वातंत्र्य हे तिच्या विकासासाठी मोलाचे असते यावर त्यांचा गाढ विश्वास होता." पण त्यांनी आणीबाणीला विरोध का केला नाही, त्याविरुद्ध रणशिंग का फुंकले नाही? याचे उत्तर म्हणून कराड साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष म्हणून केलेल्या भाषणात चव्हाणसाहेब म्हणतात. "मुक्त विचारांचा सिद्धान्त हा एक आकर्षक विचार आहे. आणि मूलतः समर्थनीय आहे. पण आजच्या सामाजिक; आर्थिक क्षेत्रात उभे असलेले राष्ट्रीय प्रश्न यांचा संदर्भ विसरून हा सिद्धान्त यशस्वी होईल का, याचेही चिंतन होण्याची गरज आहे." यशवंतराव चव्हाण पुढे म्हणतात, "मी हे सांगितले पाहिजे, की माझी काही मतं आहेत. याबद्दल माझा आग्रह आहे. इंदिरा गांधी आमच्या नेत्या आहेत. त्यांचा निषेध करून काही होणार नाही. त्यांच्या वीसकलमी कार्यक्रमांची नोंद घराघरांत पोचली आहे." मला वाटते, यावर मी अधिक भाष्य करण्याची गरज नाही.

दुसरे एक विश्लेषण भास्कर भोळे यांचे आहे. ते म्हणतात, "आणीबाणीतील दंडसत्तेचे अतिरेक उघड्या डोळ्यांनी बघणे क्लेशदायक होते. संजय गांधींच्या रूपाने काँग्रेसमध्ये शिरलेल्या अपप्रवृत्ती काँग्रेसच्या संपूर्ण ध्येयनिष्ठेला व परंपरांना तिलांजली देणाऱ्या होत्या वगैरे सर्व दिसत असूनही यशवंतराव मिठाची गुळणी तोंडात धरून बसले, याचा अनेकांना अचंबा वाटत होता. त्यांच्या मनाची या काळात प्रचंड घालमेल होत असावी. पण परतीचे दोर कापून टाकल्यामुळे त्यांची अगतिक अवस्था झाली असावी, असे दिसते. एका परीने ते स्वतःच्याच कार्यपद्धतीचे बंदिवान झाले होते."

आणीबाणीच्या संदर्भात चव्हाणसाहेबांनी घेतलेल्या भूमिकेचे आणखी एक विश्लेषण ज्येष्ठ व व्यासंगी पत्रकार गोविंद तळवळकर यांनी केले आहे. त्यांच्या मते आणीबाणीस विरोध करून पक्षाबाहेर पडायचे आणि विरोधी आघाडीत सामील व्हायचे, हे यशवंतरावांना पसंत पडणारे नव्हते. जी विरोधी आघाडी तयार झाली होती, त्यामधील काही पक्षांशी त्यांचे तेव्हा व नंतर जमणारे नव्हते."

याशिवाय संसदीय लोकशाहीत जन-आंदोलनाचे स्थान काय, आणि निवडून आलेले विधिमंडळ बदलण्यासाठी निवडणूक हा उपाय आहे, की आंदोलन? असे द्वंद्व असू शकते. तळवळकर त्यासाठी १९६१ साली अहमदाबादच्या लास्की इन्स्टिट्यूटमध्ये, यशवंतरावांनी केलेल्या भाषणाचा आधार घेतात. शिवाय बाबासाहेब आंबेडकरांनी केलेल्या भाषणाचाही उल्लेख करतात. डॉ. आंबेडकर म्हणाले होते. "आपल्याला वरवरची नव्हे, तर खरी लोकशाही टिकवायची असेल तर, माझ्या मते आपण आपली आर्थिक व सामाजिक उद्दिष्टे साध्य करण्यासाठी, घटनात्मक साधनांचाच अवलंब केला पाहिजे. याचा अर्थ आपण सनदगीर कायदेभंग, असहकार आणि सत्याग्रह यांचा त्याग केला पाहिजे. सामाजिक व आर्थिक उद्दिष्टे साध्य करून घेण्यासाठी घटनात्मक साधने उपलब्ध असताना, घटनाबाह्य उपायांचा अवलंब करणे. समर्थनीय नाही असे उपाय म्हणजे अराजकाचे व्याकरण आहे. आपण जितक्या लवकर त्यांचा त्याग करू, तितके बरे."

लोकशाहीत जन-आंदोलनांचे स्थान व मर्यादा यांवर विचार होऊ शकतो, चर्चा होऊ शकते. शिवाय आपल्या स्वातंत्र्यलढ्याचे तत्त्वज्ञान गांधी-नेहरूंचे आहे. त्यांच्या या संदर्भातील विचाराचाही ऊहापोह झाला पाहिजे. पण येथे हा प्रश्नच नाही. येथे यशवंतरावांची भूमिका हा खरा प्रश्न आहे. लास्की इन्स्टिट्यूटमध्ये १९६१ साली चव्हाणसाहेब जे म्हणाले तीच त्यांची भूमिका १९७५ पर्यंत होती, पण बदललेल्या परिस्थितीत त्यांनी पाठपुरावा केला नाही हे खरे. दुसरे म्हणजे श्रीमती गांधींनी स्वतः घटनात्मक चौकटीत काम केले का? वटहुकमावर आधी राष्ट्रपतींची सही घेऊन नंतर मंत्रिमंडळाची बैठक बोलविणे, घटनेच्या कोणत्या तत्त्वज्ञानात बसते?

शिवाय पुढे आणीबाणीनंतर मधू लिमये यांनी संसदेमध्ये चव्हाणसाहेबांना आणीबाणीच्या प्रश्नावर छेडले असता आणीबाणी ही एक अपकृती होती, असे चव्हाणसाहेब म्हणाले (इमर्जन्सी वॉज ॲन अबरेशन), यावरून चव्हाणसाहेबांना आणीबाणी रुचली नव्हती हे स्पष्ट दिसते.

आणीबाणीतील चव्हाणसाहेबांच्या वर्तणुकीचे काहीसे वस्तुनिष्ठ विश्लेषण (माझ्या वाचनात आतापर्यंत आलेल्या लेखकांमध्ये) ज्येष्ठ पत्रकार कुलदीप नय्यर व सुप्रसिद्ध समाजवादी नेते कै. मधु लिमये यांच्या लिखाणांत काही प्रमाणात सापडते.

कुलदीप नय्यरांच्या मते फक्त जगजीवनराम व चव्हाण हे दोन नेतेच श्रीमती गांधींना आव्हान देऊ शकले असते. अलाहाबाद हायकोर्टाच्या निर्णयानंतर एका अटीवर श्रीमती गांधी पायउतार व्हायला तयार झाल्या होत्या आणि ती अट होती, त्यांच्या पसंतीच्या व्यक्तीकडे सत्ता सोपविण्याचा अधिकार त्यांना देण्यात यावा. जगजीवनराम व चव्हाण या दोघांनीही या अटीला विरोध केला होता. पण आता त्यासाठी ते एकत्र येऊ शकले नाहीत, कारण दोघांनाही पंतप्रधान व्हायचे होते. श्रीमती गांधींच्या विरोधात उभे राहून त्या वेळी यशस्वी होण्याची सुतराम शक्यता नसल्यामुळे त्यांनी श्रीमती गांधींच्या विरोधात उभे ठाकण्याचे धाडस केले नाही. नायर पुढे लिहितात, चव्हाण व जगजीवनराम यांना भेटण्यासाठी ते त्या दोघांच्या घरी गेले. तिथे त्यांनी पाहिले, की या दोघांच्या घरी येणाऱ्या-जाणाऱ्यांच्या गाड्यांचे नंबर पोलीस लिहून घेत होते. चव्हाणांनी कुलदीप नय्यरांची भेट घेतली नाही व जगजीवनरामांनी केवळ मिनिट-भरासाठी भेट पुढे दिली.

कुलदीप नय्यर यांच्या मते देशातील त्या वेळच्या वातावरणात पंतप्रधानपद रिकामे होईल व अशा वेळी आपण तिथे नसलो, तर ते दुसऱ्यालाच मिळणार. पंतप्रधानपदाच्या या आशेने जगजीवनराम व चव्हाण हे आणीबाणीला विरोध न करता गप्प राहिले. कुलदीप नय्यर म्हणतात, ते काही प्रमाणात खरे आहे. पण ते आणीबाणीपूर्व घटनांना लागू पडते. आणीबाणीनंतर

पंतप्रधानपद दुसऱ्या कोणाला मिळण्याचा प्रश्नच नव्हता. आपल्या हातून ते पद जाऊ नये, म्हणूनतर श्रीमती गांधींनी आणीबाणी आणली.

मधू लिमये म्हणतात (शब्द बरेचसे त्यांचेच), कधी इंदिरा कधी सिंडिकेट असे केल्याने सिंडिकेटचे पुढारी त्यांच्यावर नाराज असत; शिवाय इंदिरा गांधींच्या गोटातही या धरसोडीच्या धोरणामुळे त्यांचे वजन खूप कमी झाले. आणीबाणीच्या काळात आणीबाणीस विरोध न करता पाठिंबाच दिला व नंतर आणीबाणी संपल्यावर आणीबाणी हे एक अपकृत्य होते, असे म्हणून त्यांनी इंदिरा गांधी यांची नाराजी ओढून घेतली.

दिल्लीचा राजकीय रंगमंच फारच मोठा आहे. त्याचा आटोप येण्यासच वेळ लागतो. यशवंतरावांनी भारताच्या विभिन्न प्रांतांत मित्र व अनुयायी निर्माण केले नाहीत. त्यांचे नेतृत्व महाराष्ट्रापुरतेच मर्यादित राहिले. त्याला राष्ट्रीय अधिष्ठान प्राप्त होऊ शकले नाही. अंगात गुण असून भागत नाही, लोकरंजनाची कलाही लोकशाहित लागते. तसेच सत्तेच्या राजकारणात शिकारी कुत्र्याची, संधीचा वास येण्याची उपजत बुद्धी लागते व ती इंदिरा गांधींच्या तुलनेत (यशवंतरावांकडे) कमी पडली. सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे अशा राजकारणात जो निर्दयपणा लागतो, त्यात यशवंतराव त्यांच्यावरील बौद्धिक संस्कारांमुळे कमी पडले.

यशवंतराव चव्हाणांनी विरोध न करण्यास आणखीही दोन कारणे संभवनीय वाटतात. पहिले म्हणजे चव्हाणांनी नेहरूंच्या प्रति असलेल्या त्यांच्या निष्ठा, नेहरूकन्या म्हणून इंदिरा गांधींच्या चरणी वाहण्यापर्यंत नेण्याची गरज नव्हती. नेहरू आणि इंदिरा या एकाच छाप्यातल्या दोन व्यक्ती नसून त्या दोन निरनिराळ्या छाप्यांतल्या आहेत, हे त्यांनी ओळखले पाहिजे होते. इंदिरा गांधींनी त्या क्षणाला ज्या पद्धतीने त्यांची नाकेबंदी केली होती, ती त्या क्षणाला भेदणे अशक्य नव्हते, पण कठीण होते. खुद्द चव्हाणसाहेबांना आणीबाणी कळली ती विरोधकांची धरपकड झाल्यानंतर आणि पुढे आणीबाणी किती वर्षे चालेल याचा काहीच अंदाज येत नव्हता. पुनः निवडणुका होतील की नाही, याची शाश्वती नव्हती. तुरुंगाच्या कालावधीचाही अंदाज येत नव्हता. जिवाभावाचे साथीसोबती नव्हते. होते त्यांच्याशी विचारविनिमय करण्यास वेळ नव्हता, संधी नव्हती. आणीबाणीनंतर चव्हाणसाहेब प्रथम महाराष्ट्रात आले, त्या वेळी राजीनामा देऊन मोकळे होण्याची त्यांना एक संधी होती. पण त्याआधीच इंदिरा गांधींनी एकमुखी महाराष्ट्र काँग्रेस पोखरली होती. जराही बंड झाले असते, तर राष्ट्रपती-राजवट अटळ होती. कदाचित या सर्वांचा परिणाम म्हणून त्यांनी आणीबाणीस विरोध केला नसावा. मनात नसताना सुद्धा पक्षाचा शिलेदार म्हणून त्यांनी आणीबाणीचे समर्थन केले.










# कृष्णाकाठ : यशवंतराव चव्हाणांचं आत्मचरित्र

डॉ. सुनंदा देशपांडे

कृष्णाकाठ हे १९८४ मध्ये प्रकाशित झालेले मा. यशवंतराव चव्हाणांचे आत्मचरित्र. या त्यांच्या प्रथम खंडात त्यांच्या जन्मापासूनचा म्हणजे १९१३ ते १९४६ पर्यंतचा कालखंड चित्रित झाला आहे. यशवंतराव चव्हाणांनी महाराष्ट्राच्या आणि देशाच्याही राजकारणात महत्त्वाचे योगदान दिले. त्यांचे अष्टपैलू व्यक्तिमत्त्व कसे घडत गेलं, याच मनोज्ञ दर्शन आपल्याला त्यांच्या या आत्मचरित्रातून घडते. मात्र या आत्मचरित्राच्या पहिल्या खंडातून १९४६ पर्यंतच्याच कालखंडाचं चित्रण आल्यामुळे यापुढील कालखंडात त्यांनी केलेल्या कामगिरीचं आणि कर्तृत्वाचं चित्रण आलेलं नाही.

जडणघडण, वैचारिक आंदोलन आणि निवड अशी या आत्मचरित्राची तीन भागांत विभागणी केली आहे. जडणघडण या प्रकरणात त्यांचं बालपण, शिक्षण, त्यांची वाचनाची आवड, त्यांचे छंद तसेच स्वातंत्र्यपूर्व काळातील घटना-प्रसंगांतून त्यांचं घडत गेलेलं व्यक्तिमत्त्व यांचं चित्रण आलं आहे. देवराष्ट्र हे त्यांचं जन्मगाव. ग्रामीण जीवनाची पार्श्वभूमी हा त्यांच्या जीवनाचा श्रीगणेशा. पुढे ते राजकारणात आल्यानंतरही ग्रामीण जीवनाची ओढ कायम राहण्याचं कारण हेच आहे. त्यांची पहिली शाळा देवराष्ट्राची. यशवंतराव त्यांच्या आईचं पाचवं किंवा सहावं अपत्य. त्यांचं लहानपण तसं गरिबीतच गेलं, त्यामुळेच अशा स्तरातील आणि परिसरातील मुला-माणसांबद्दल त्यांना पोटतिडिक होती. वयाच्या चौथ्या वर्षी ते पितृछत्राला पारखे झाले. वडलांच्या पश्चात आईनंच या सगळ्या भावंडांचा सांभाळ केला. वडलांच्या जागी मोठ्या भावाला बेलिफाची नोकरी मिळाली आणि त्यांच्या कुटुंबाचा गाडा कसाबसा सुरू झाला. देवराष्ट्र सोडून त्यांचं कुटुंब कराडला आलं. मात्र देवराष्ट्रच्या अनुभवाच्या शिदोरीने त्यांची सामाजिक जाणीव पुष्ट केली.

कराडच्या वातावरणात वाढताना महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनात काम करणारे काही नवे प्रवाह आणि नव्या शक्ती त्यांच्या नकळत त्यांच्या जडणघडणीस हातभार लावीत होत्या. बहुजन समाजातल्या मुलामुलींनी शिक्षण घेतले पाहिजे, सार्वजनिक कार्यात भाग घेतला पाहिजे, अशा मानसिक आणि वैचारिक वातावरणाचा संस्कार त्यांच्यावर घडत गेला. याच काळात सत्यशोधकीय आणि ब्राह्मणेतर चळवळीचे संस्कारही त्यांच्यावर नकळत होत होते. वयाच्या चौदाव्या वर्षीच मुंबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या निवडणुकीत यशवंतरावांनी स्वयंसेवक म्हणून काम केलं. शालेय वयातच वृत्तपत्रवाचनाची सवय जडल्याने आपल्या अवतीभवती घडणाऱ्या आणि देशातर्गत घडामोडींविषयीची जागरूकता त्यांच्यात निर्माण झाली. शिवछत्रपती मंडळ सुरू करून त्यांनी सामाजिक कार्याला सुरुवात केली. ब्राह्मणेतर चळवळीच्या संकुचित दृष्टिकोनातून बाहेर पडून आपण काही केले पाहिजे, याची जाणीव याच काळात त्यांच्या ठिकाणी निर्माण झाली. शिवजयंती उत्सवाच्या निमित्ताने व्याख्यानांसाठी वक्ते ठरवणे, भजनाचे कार्यक्रम आयोजित करणे, त्यासाठी लोकांना संघटित करणे, अशा सार्वजनिक कामाला याच काळात सुरुवात झाली. सार्वजनिक कार्यकर्ता म्हणून लोक त्यांना गावात ओळखू लागले.

पुढे टिळक हायस्कूलचा विद्यार्थी झाल्यावर त्यांच्या वाचनाच्या कक्षा अधिक रुंदावल्या. हायस्कूलमधून होणाऱ्या वक्तृत्वस्पर्धेतून त्यांची वक्ता म्हणून जडणघडण झाली. गायन, वाचन, भजन, कीर्तन, नाटक, वक्तृत्व, कुस्त्यांचे फड, समाजकार्य यांतून त्यांचं एक रसिक, अष्टपैलू व्यक्तिमत्त्व घडत गेलं. देशासाठी उपोषण करून प्राणार्पण करणाऱ्या यतींद्रनाथांच्या बलिदानाचा संस्कार त्यांच्या मनावर या काळात एवढा काही झाला, की त्या क्षणी आपलं संपूर्ण जीवन देशकार्यालाच वाहण्याचा संकल्प त्यांनी केला. पोहणे, वाचन, भाषण, नाटक हे सगळे उद्योग चालू असताना विचारातून मनात निर्माण








झालेली राष्ट्रप्रेमाची मूळ ऊर्मी हीच त्यांच्या ठिकाणी टिकावू ठरली.

स्वातंत्र्यचळवळीच्या निमित्ताने कृष्णेच्या घाटावर होणाऱ्या सभांमध्ये भाषण करण्यासाठी वाईच्या प्राज्ञपाठशाळेचे विद्वान पंडित तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी आठवडाभर आल्याची अविस्मरणीय आठवण आपल्या आत्मचरित्रात चव्हाणांनी सांगितली आहे. त्या वेळी या भाषणांना होणारी तोबा गर्दी आणि भाषणानंतर पोलिसांनी लक्ष्मणशास्त्रींवर भरलेला खटला, त्यानंतर त्यांना झालेली सहा महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा या चव्हाणांनी सांगितलेल्या आठवणींतून एकूणच त्या काळातील दडपशाहीचं चित्र आपल्यासमोर उभं राहतं.

'वैचारिक आंदोलन' या आत्मचरित्राच्या दुसऱ्या प्रकरणामध्ये पारतंत्र्यकाळातील स्वातंत्र्यचळवळीला आलेल्या वेगाचं चित्रण आलं आहे. ग्रामीण समाजाचा प्रतिनिधिवर्ग मोठ्या प्रमाणात जेलमध्ये गेला, ती १९३० सालची चळवळ ही लोकाभिमुख चळवळ कशी शक्तिशाली बनू लागली, याचं चित्रण आलं आहे. चळवळीत सहभागी होतानाच शाळेचा अभ्यास आणि परीक्षा यांकडेही त्यांनी कसं लक्ष पुरवलं, मसुरपरिषदेच्या निमित्ताने अनेक कार्यकर्त्यांशी त्यांची झालेली ओळख, वाई, सातारा, वाळवे, तासगाव या तालुक्यांतील ग्रामीण भागातून झालेला कार्यकर्त्यांची त्यांना झालेली माहिती, पुढे पंतले बोंदसे कार्यकर्ते त्यांचे झालेले मित्र, पुढच्या ज्ञानप्रकाशमध्ये वार्ताहर म्हणून त्यांनी केलेलं काम, २६ जानेवारीला कराडच्या हायस्कूलमध्ये झेंडा फडकावून वंदे मातरम्‌च्या घोषणा दिल्याबद्दल त्यांना झालेली अटक, त्यांची कराडजेलमध्ये झालेली रवानगी, अठरा महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा, तिथून येरवडा जेलमध्ये झालेली रवानगी या साऱ्या घटनांचं चित्रण यशवंतरावांनी आपल्या आत्मचरित्रात समरसून केलं आहे.

जेलमधलं पंधरा महिन्यांचं जीवन म्हणजे आपल्या जीवनाला एक उत्तम काळ होता, असे यशवंतराव म्हणतात. इथे त्यांच्याबरोबर आचार्य भागवत, रावसाहेब पटवर्धन अशी माणसं होती. रावसाहेब पटवर्धनांमुळे इथे राजबंद्यांना वाचण्यासाठी पुस्तकांची सोय झाली. मुंबई, पुणे येथील कार्यकर्त्यांच्या आणि जाणत्या मित्रांच्या सहकार्यामुळे लायब्ररीतून आणि इतरही काही ठिकाणांहून नानाविध पुस्तके जेलमध्ये येऊ लागली. त्यामुळे थोड्याच दिवसांत बारा नंबरच्या बराकीत एक चांगल्यापैकी लायब्ररी स्थापन झाली. याच बराकीत एस. एम. जोशी होते, ह. रा. महाजनी होते कालीदासाच्या शाकुंतलचं वाचन या बराकीत सुरू झालं. आचार्य भागवतांनी शेक्सपियरचं 'ज्युलियस सीसर' नाटक इथे शिकवायला घेतलं. इथे गांधीवाद, समाजवाद, मार्क्सवाद यांवरती चर्चा होत असे. अशा प्रकारे या जेलमध्ये चव्हाणांचे राजकीय शिक्षण नियमाने आणि सातत्याने झाले. त्यांचे विचारविश्व इथे घडलं. रशियन क्रांतीबद्दलही त्यांनी बरेच वाचले. जागतिक दृष्ट्या लेनिनचं कार्य त्यांनी इथेच समजावून घेतले. मानवेंद्रनाथ रॉय या कम्युनिस्ट नेत्याच्या व्यक्तिमत्त्वाची ओळखही इथेच झाली.

या राजकीय स्वरूपाच्या पुस्तकांबरोबरच वाङ्मयीन पुस्तकांचं वाचनही चव्हाणांनी इथे केले. स्वा.सावरकरांच्या गोमांतक आणि कमला या काव्याची गोडीही त्यांनी इथेच चाखली. या बारा नंबरच्या बराकीत चर्चा, वक्तृत्व, शिक्षण एवढेच होते असे नाही, तर पुढे बराकीचं बुलेटीनही निघू लागलं. ह. रा. महाजनींनी पुढे लोकसत्तेचा संपादक म्हणून लौकिक मिळवला. त्यांच्या पत्रकारितेचा श्रीगणेशा या बारा नंबरच्या बराकीत झाला. १९३२ साली गांधीजींच्या कम्युनल अवार्ड संबंधीच्या उपवासाचा या केंद्रात असणाऱ्या सर्वांवरच परिणाम झाला. हरिजनांसाठी स्वतंत्र मतदार-संघाविरोधात त्यांचं हे उपोषण होत. डॉ. आंबेडकरांनी पुणे करारावर सही करून गांधीजींचे प्राणं वाचवले. चव्हाणांच्या मनातली आंबेडकरांबद्दलची आदराची भावना या घटनेनं अधिक दुणावली. या जेलमध्ये काढलेले एक वर्ष म्हणजे चव्हाणांसाठी एक प्रकारे विद्यापीठीय जीवन होते. इथे भेटलेली माणसं, वाचलेली पुस्तकं, झालेल्या चर्चा, त्यांतून आलेली नवी जाण या त्यांच्या भविष्यातल्या राजकीय जीवनाला पोषक गोष्टी या जेलमधून त्यांना मिळाल्यामुळे या जेलबद्दल एक प्रकारचा कृतज्ञभाव चव्हाणांच्या मनात निर्माण झाला.

विसापूर जेलमध्ये त्यांची गुजराती भाषेशी ओळख झाली. त्याचा उपयोग पुढे त्यांना द्विभाषिक राज्याचा मुख्यमंत्री असताना झाला. १९३३ च्या मे महिन्यात त्यांची

शिक्षेची मुदत संपली. घरी आल्यावर अपुरे राहिलेले शिक्षण पूर्ण करण्याच्या उद्योगाला ते लागले. शिक्षणाबरोबरच हरिजन, मातंग आणि चांभारवस्तीत जाऊन शिक्षणाच्या प्रसाराचं त्यांचं कार्यही सुरूच होतं. १९३४ नंतर उच्च शिक्षणासाठी ते कोल्हापुरात आले. इथे त्यांनी राजाराम महाविद्यालयात प्रवेश घेतला. राजाराम महाविद्यालयात प्राध्यापक असणाऱ्या ना. सी. फडक्यांच्या व्यक्तिमत्त्वाने ते प्रभावित झाले. इथेच माधव ज्युलियन यांच्याशीही त्यांची भेट झाली. कोल्हापूरची ही उच्च शिक्षणाची चार वर्षं त्यांच्या आयुष्यातील पायाभूत आणि गतिमान वर्ष ठरलीत. राजकारण, इतिहास आणि वाङ्मय या दिशेने आता त्यांचे वाचन सुरू झाले. एच. जी वेल्सच्या लाईन ऑफ हिस्ट्री, बर्नाड शॉ च्या नाटकांच्या प्रस्तावना, फ्रेंच लेखक व्हिक्टर ह्यूगोच्या कादंबऱ्या, हरिजन हे गांधीजींचं साप्ताहिक त्यांच्या वाचनात होतं. समाजवादाच्या प्रभावाखाली असल्याने पं. जवाहरलाल नेहरूंच्या नेतृत्वाकडे ते आकर्षित झाले. गांधींच्या व्यक्तिमत्त्वावर निष्ठा, पं. जवाहरलाल नेहरूंच्या विचारांशी जवळीक आणि मानवेंद्रनाथ रॉय यांच्या विचाराकडे आपुलकीनं पाहण्याचा दृष्टिकोन अशा एका वैचारिक त्रिकोणात या काळात चव्हाण उभे असल्याचं चित्र त्यांच्या आत्मचरित्रातून आपल्याला दिसतं.

यशवंतराव चव्हाण ज्यू. बी. ए. ला असताना १९३६ साली राजकारणाला मोठा वेग आला होता. याच काळात त्यांची सरदार पटेलांशी भेट झाली. कायद्याचा अभ्यास करण्यासाठी त्यांनी एल. एल. बीला प्रवेश घेतला. याच काळात दुसऱ्या महायुद्धाची ठिणगी पडली. इंग्लंड-फ्रान्स विरुद्ध जर्मनी युद्ध सुरू झालं. गांधीजींनी ब्रिटिशांविरुद्ध सत्याग्रहाचं शस्त्र उगारलं आणि प्रतीकात्मक सत्याग्रह करण्याचं काम त्यांनी विनोबांवर सोपवलं. चव्हाण कायद्याची परीक्षा उत्तीर्ण झाले. या काळात ते काँग्रेसचा अध्यक्ष या नात्यानं काम पाहत होते. या काळात स्थानिक स्वराज्य संस्था ताब्यात ठेवण्याचं काम त्यांनी केलं. या कामातून सर्व भागांतल्या कार्यकर्त्यांशी त्यांचे घनिष्ठ संबंध प्रस्थापित झाले. सातारा जिल्ह्यातील राजकीय क्षेत्रात चव्हाणांची एक प्रतिमा तयार झाली. या राजकीय घडामोडी सुरू असतानाच त्यांचा वेणूताईंशी विवाह झाला. १९४१ मध्ये एक वर्षभर त्यांनी वकिलीचा व्यवसाय केला. १९४२ साली कराडला झालेल्या दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलनात बहुजन समाज व साहित्य या परिसंवादाचं अध्यक्षपद चव्हाणांनी भूषवलं. या परिसंवादातलं चव्हाणाचं भाषण व्यासंगपूर्ण झालं.

या काळात ब्रिटिश सत्तेविरुद्ध मोर्चे काढण्यात आले. कराडच्या मोर्चाने सातारा जिल्ह्यात एक मोठी चळवळ उभी राहिली. कराड, पाटण, तासगाव, वडूज आणि इस्लामपूर या ठिकाणी निघालेले मोर्चे हे १९४२ च्या चळवळीच्या इतिहासातील सोनेरी पान ठरले. या काळात भूमिगत चळवळीलाही जोर चढला. याच काळात त्यांची डॉ. लोहियांशी भेट झाली. चव्हाणांच्या भूमिगत चळवळीची झळ वेणूबाईनाही पोचली. कराड पोलिसांनी वेणूताईंना अटक करून जेलमध्ये टाकले. याच काळात त्यांच्या कुटुंबावर आणखी एक मोठी आपत्ती कोसळली. त्यांचे थोरले बंधू ज्ञानदेव यांचा एकाएकी मृत्यू झाला. यशवंतराव वेणूताईंची प्रकृती पाहायला फलटणला आले असता त्यांना तिथेच अटक करण्यात आली आणि अशा रीतीने त्यांचे दहा महिन्यांचे भूमिगत जीवन संपुष्टात आले. सभेत भाषण केल्याच्या आरोपावरून त्यांच्यावर खटले भरले गेले. त्यांना सहा महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा होऊन त्यांची रवानगी येरवडा जेलमध्ये झाली. इथे वाचनाची सोय उत्तम होती. इथे त्यांनी कम्युनिस्ट राजवटीने केलेल्या राजकीय छळाची 'डार्कनेस ॲट नून' ही कादंबरी, इंग्लंडची औद्योगिक क्रांती, फ्रान्सची राज्यक्रांती असे वाचन केले. या वाचनामुळे जागतिक इतिहासाचे एक पुरेपूर चित्र त्यांच्या डोळ्यांसमोर उभे राहिले. इथे त्यांची ना. ग. गोरे यांच्याशी भेट झाली.

कराडमध्ये यशवंतरावांचा शिवाजी एज्युकेशन सोसायटी या शिक्षण संस्थेशी घनिष्ट संबंध आला. १९४६ साल उजाडलं नि देशात सर्वत्र निवडणुकीचं वारं वाहू लागलं. या निवडणुकीत यशवंतराव विजयी झाले. श्री. बाळासाहेब खेरांनी पार्लमेंटरी सेक्रेटरी म्हणून त्यांची निवड केली. यशवंतराव चव्हाणांच्या या आत्मचरित्रापासून इथपर्यंतचा त्यांचा जीवनप्रवास चित्रित झाला आहे.

या आत्मचरित्रासंदर्भात जाणवलेल्या काही ठळक

अनुक्रमणिका






नोंदी अशा–

१) कृष्णेबद्दलचे यशवंतरावांच्या मनातले प्रेम 'कृष्णाकाठ' या त्यांच्या आत्मचरित्राच्या नावातून आविष्कृत झाले आहे.

२) या आत्मचरित्रात यशवंतरावांच्या वैयक्तिक आणि कौटुंबिक जीवनाचे चित्रण अल्पांशाने आले आहे.

३) ह्या आत्मचरित्रातून १९१३ ते १९४६ या मर्यादित कालखंडातील राजकीय सामाजिक घटनांचे चित्रण आले आहे.

४) एकूणच स्वातंत्र्यपूर्व काळातील राजकीय चळवळीचे चित्र या आत्मचरित्रातून आपल्याला पाहायला मिळते.

५) यशवंतराव चव्हाणांचे रसिक आणि अष्टपैलू व्यक्तिमत्त्व कसे घडत गेले आणि त्यातून त्यांचे राजकीय नेतृत्व कसे साकारत गेले याचे मनोज्ञ दर्शन त्यांच्या या आत्मचरित्रातून आापल्याला घडते.





अनुक्रमणिका








# भ्रष्टतेकडे जाणाऱ्या संसदीय लोकशाहीला पर्याय शोधायला हवा!

श्री. बाबूराव चंदावार

महाराष्ट्र राज्यनिर्मितीनंतर (स्व.) यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री झाले. कालांतराने ते भारताचे संरक्षणमंत्रीही झाले. यातून एक व्यक्ती या नात्याने व त्यांचे कार्य या नात्यानेदेखील त्यांची यथायोग्य ओळख महाराष्ट्राला व भारताला झालेलीच होती. ही ओळख त्यांच्या यशस्वितेची म्हणता येईलच! पण, जी राजकीय विचारसरणी त्यांनी स्वीकारली होती, त्यातून त्यांच्या राजकारणाची दिशा सुस्पष्ट होऊ शकली किंवा काय, याचा शोध मात्र घ्यायलाच हवा! कारण, निश्चित विचारसरणी स्वीकारून स्वातंत्र्योत्तर काळात राजकारण करणे, या देशाततरी सहसा कोणत्याही राजकारणी व्यक्तीला जमले असावे, असे वाटतच नाही. (स्व.) यशवंतराव चव्हाणही याला अपवादस्वरूप ठरलेले नसावेत, असेच वाटते. कारण, ज्यांची राजकारणाची मूळ पीठिका राज्य करण्याचा हेतू बाळगूनच बनवली गेलेली आहे व असते, त्यांचे राजकारण राज्य करण्याच्या इच्छा-आकांक्षेतलेच मुळात असू शकते, व म्हणूनच अनेक तऱ्हेच्या तडजोडी करूनच राजकारणात यश संपादन करावे लागते व ते संपादन करताही येते. यात इष्टानिष्टतेचा भेद करायचा नसतो. राजकारणाचे व राजकारणी व्यक्तीचे चारित्र्य यातूनच निर्माण होत गेले आहे. या देशात राजकीय चारित्र्य अशाच पद्धतीने घडत गेलेलेही आहे! म्हणून, मूल्याधारित राजकारण करण्याविषयी जेव्हा बोलले जाते, किंवा याच्या आवश्यकतेचे प्रतिपादन केले जाते, तेव्हा राजकारण आणि राजकीय मूल्ये म्हणून जी काही असतील, त्या सर्वांची संगती कशी लावायची, असा एक प्रश्न उपस्थित होतो व तो अनुत्तरितच राहून जातो! आजवर तो अनुत्तरीतच राहिलेलाही आहे. पण, राजकारणाचा व मूल्यधारिततेचा विचार म्हणून काही यापूर्वी राहू शकलेला होता व वर्तमानात तो राहिलेलाही आहे, याची लक्षणे भूतकाळात सापडत नव्हती व वर्तमानातही सापडत नाहीत. कदाचित हेच स्वाभाविक मूल्याधारित राहू शकते व ते मूल्याधारित केलेही जाऊ शकते, या म्हणण्याला तसा कोणताच निश्चित अर्थ असेल व आहे, ते जाणून घेणे शक्य होऊ शकेल! कारण, यामुळे राजकीय मूल्य म्हणून काही असते व असू शकते हे कळेलच, शिवाय मूल्याधारित राजकारणही असते वा असू शकते, याचाही शोध लावता येईल!

स्वातंत्र्यपूर्व काळातही राजकारण केले गेले होते. याचे विविधांगी व भिन्न स्वरूपातले मूल्य 'स्वातंत्र्य' हे सर्वांचे मिळून एकच होते. या देशाला ब्रिटिश साम्राज्यापासून मुक्त होता यावे, हा त्या वेळी 'स्वातंत्र्य'चा अर्थ होता. पण, याचे वेगवेगळे मार्ग झाले होते. म्हणून स्वातंत्र्य प्राप्त करण्याचे भिन्न मार्ग अस्तित्वात आले होते. यातून स्वातंत्र्य म्हणजे नेमके काय, याचा बोध होत नव्हता. म्हणून, स्वातंत्र्याची संकल्पना ब्रिटिश सत्तेचा भारतात अंत व्हावा, अशा नकारात्मकतेचीच (निगेटिव) राहू शकली होती. महात्मा गांधींना मात्र स्वातंत्र्याची सकारात्मकता लक्षात येत होती, असे त्यांनी १९०७ साली लिहिलेल्या 'हिन्द-स्वराज्य' या पुस्तकातून दिसून येते. तेव्हा, नकारात्मक व सकारात्मक या दोन्ही अर्थांनी 'स्वातंत्र्य' ही संकल्पना स्वातंत्र्यपूर्व काळात अस्तित्वात आली होती. यासाठी राजकारणही केले गेले होते. म्हणून स्वातंत्र्यपूर्व काळातले राजकारण स्वातंत्र्य या एकाच मूल्याचे होते. ते मूल्याधारित होते, असे म्हणता येईल. या काळात जगातल्या परिस्थितीचाही प्रभाव भारताच्या स्वातंत्र्य-चळवळीवर पडत होता. यात प्रामुख्याने १९१७ च्या रशियात झालेल्या बोल्शेविक क्रांतीचा प्रभाव पडलेला होता. मानवेन्द्रनाथ रॉय याच काळात बोल्शेविक क्रांतीची व्यूहरचना करणाऱ्या लेनिनचे एक सहकारी म्हणून नावारूपाला आले होते. ते भारतीय स्वातंत्र्य-चळवळीच्या नेतृत्वाकडे लक्ष ठेऊन होते. त्यांनी, बोल्शेविक क्रांतीचे समर्थन महात्मा गांधींनी का केले नाही? असा प्रश्न








त्यांना पत्र लिहून विचारलाही होता. पुढे स्टॅलिनच्या जाचाला कंटाळून भारतात एकांतवासात येऊन राहिले होते. मानवेंद्रनाथ रॉय यांच्या चिंतनातून 'नवमानवता-वादाचा' उद्‌भव झाला. तो महाराष्ट्रातल्या स्वातंत्र्यप्रिय सक्रिय अभ्यासकांना आकर्षून घेऊ शकला होता. यांचा रॉयवादी गट महाराष्ट्रातही अस्तित्वात आलाच होता. याच्या संपर्कात (स्व.) यशवंतराव चव्हाण आले होते. पण, ते रॉयवादी झाले नव्हते. काँग्रेस पक्षाचेच राहिले होते. पण, त्या काळात समाजवाद्यांच्या किंवा साम्यवाद्यांच्या संपर्कात यशवंतराव नव्हते, फक्त रॉयवाद्यांच्या संपर्कात होते. पण, ते ज्या काँग्रेस पक्षात होते त्या पक्षावर रॉयवादाचा अनुकूल परिणाम झालाच नव्हता. तरीही (स्व.) लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या संपर्कामुळे असेल कदाचित, यशवंतराव साहित्य आणि संस्कृतीच्या आकर्षणात पडले व त्यांनी ते मुख्यमंत्रिपदावर असताना महाराष्ट्र राज्यात मराठी 'साहित्य आणि संस्कृती' मंडळाची महाराष्ट्र शासनाच्या वतीने निर्मितीही केली. ही यशवंतरावांनी महाराष्ट्राच्या लोकजीवनाला दिलेली एक मोठी देणगीच म्हणावी लागेल. यामुळे साहित्य आणि संस्कृतीच्या चळवळीकडे महाराष्ट्र शासन वळाले व त्याची एक परंपराही निर्माण झाली, हे ठीकच झाले!

अशा तऱ्हेने राजकारणाचा मराठी संस्कृतीशी मेळ बसवण्याचा प्रयत्न यशवंतरावांनी केला होता, तरी तो कितपत यशस्वी झाला असेल, हा एक प्रश्न उपस्थित केला जाऊ शकतो. कारण, सध्या जे महाराष्ट्राचे राजकारण दिसते आहे, ते मराठी संस्कृतीच्या विकास व संवर्धनासाठी प्रेरक नसून घातकच ठरत असावे, असेच काहीसे स्वरूप झालेले दिसते आहे. हे संक्षेपानेच पण, थोड्या तपशिलात जाऊन पाहायला हवे.

स्वातंत्र्यपूर्व काळात काँग्रेस पक्षाला समाजवादाकडे वळवण्याचा प्रयत्न काँग्रेस अंतर्गत समाजवादी गटाने केला होता. याचे नेतृत्व जयप्रकाश नारायण व आचार्य नरेन्द्र देव, मिनू मसानी, नंबुद्रिपाद, डॉ. राममनोहर लोहिया आदी विविध छटा असलेले व स्वातंत्र्यात वेगवेगळ्या पक्षांचे अध्वर्यू झालेले स्वातंत्र्यवादी यात सहभागी झाले होते. पु. य. देशपांडे (नागपूर) हेदेखील यात सहभागी झालेच होते. काँग्रेसवर व पं. जवाहरलाल नेहरूंच्या नेतृत्वावर याचा कितपत परिणाम झाला असेल, याविषयी काहीच सांगता येण्यासारखे नाही. पण, काँग्रेस पक्षाला पुरोगामी दिशा देण्याचा प्रयत्न यातून केला गेला होता, एवढे मात्र निश्चितच म्हणता येईल! संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत अनेक डाव्या पुरोगामी पक्षांचे धुरीण सहभागी झाले होते. अशांचेच नेतृत्व संयुक्त महाराष्ट्रातल्या काँग्रेसपक्षाला पुरोगामित्वाची दीक्षा यातून मिळावी, ही जी अपेक्षा केली गेली होती, ती मात्र पूर्ण होऊच शकली नसावी, असे वाटते. याला कोण किती जबाबदार मानले जातील, यावर स्वतंत्रपणे विचार करायला हवा.पण, यशवंतराव चव्हाणांच्या काँग्रेस नेतृत्वाने काँग्रेस पक्षाला पुरोगामित्वाची दीक्षा मिळावी, या दिशेने फारशी प्रगती केली नव्हती. म्हणूनच कदाचित या वेळी महाराष्ट्रात उजव्या प्रतिगाम्यांच्या पर्याय निर्माण करण्याचा प्रयत्न करून त्या प्रभावातच महाराष्ट्र वावरताना दिसते आहे, तसे दिसले नसते! महाराष्ट्रातली प्रगतिशील पुरोगामी राजकीय चळवळच नाहीशी झाली असावी की काय, असे एक विदारक चित्र यातूनच निर्माण झाले आहे. म्हणून, उजव्या प्रतिगामी शक्तींना चेव आला असून या शक्ती काही प्रसंगांत फॅसिझमचा पुरस्कार करताना दिसतही आहेत! यामुळे महाराष्ट्रातही लोकशाहीला मानणाऱ्या नक्सली-माओवादाचा डाव्या क्रांतिकारकांचा पर्याय अस्तित्वात आला असेल व त्याचा विस्तार होत असेल, तर उजव्या प्रतिगाम्यांना नाकारण्यासाठी लोकशाहीला मानणारे डावे पुरोगामीही नक्सली-माओवाद्यांशी तडजोड करतील किंवा काय, यावर विचार करायला हवा. कारण, फॅसिस्ट शक्तींना उत्तेजन मिळू नये म्हणूनच नक्सली-माओवादाचा स्वीकार केला जाऊ शकतो. याची लक्षणे राष्ट्रीय पातळीवर काही राज्यांतल्या अनुभवावरून दिसून येत आहेत, हे लक्षात घ्यायला हवे. या दृष्टीने विचार करताना लक्षात येते ते असे, की काँग्रेस पक्षाने प्रगतिशील व पुरोगामी राजकारण करण्यासाठी उजव्या प्रतिगाम्यांना संधीच उपलब्ध होऊ नये, याची काळजी घ्यायला हवी होती. ज्यांना यशवंतराव चव्हाणांचे नेतृत्व मान्य झाले होते, त्यांचे हे परम कर्तव्य होते. पण यशवंतरावांचे नेतृत्व मान्य करूनच काँग्रेस पक्षातले जे सत्तापदावर जाऊ शकले आहेत, त्यांनी

पुरेशी काळजी घेतली नाही व यामुळेच उजव्या प्रतिगामी शक्तींना संधी उपलब्ध झाली असावी, असे म्हणता येऊ शकते! यावर महाराष्ट्रात विचारमंथन करण्याची गरज निर्माण झाली आहे.

सध्याची राष्ट्रीय परिस्थिती धोकादायक वळणावर येऊन उभी राहिलेली आहे. राजकारणाचे गुन्हेगारीकरण होत असल्यामुळे व याचे प्रमाण दिवसेंदिवस वाढतच जाते आहे म्हणूनही, संसदीय लोकशाही ज्या अंतर्द्वंद्वातून (इतर कान्ट्रडिक्शन्स) जाताना दिसते आहे, त्याचा परिणाम संसदीय लोकशाही कोलमडून पडण्यात होऊही शकेल! म्हणून, यामुळे भारताच्या स्वातंत्र्यालाच आव्हान दिले जाऊ शकते. नक्सली-माओवाद स्वतःला याचा पर्याय मानूनच भारतीय जनमानसावर दहशतीचा अवलंब करून पुढे सरसावतो आहे. अशा स्थितीत महाराष्ट्राच्या लोकजीवनावर स्वातंत्र्याला अनुसरूनच भ्रष्ट संसदीय लोकशाहीला नवा पर्याय शोधण्याच्या कामी सुयोग्य परिणाम घडवण्याची जबाबदारी घ्यावी लागणर आहे. (स्व.) यशवंतराव चव्हाणांच्या शताब्दी वर्षात यावरच महाराष्ट्रात प्रामुख्याने विचार करायला हवा!














**वाचकांचा पत्रव्यवहार**

प्रा. म. शं. बाबगावकर
मुंबई.

संपादक, नवभारत मासिक,
वाई.

सस्नेह नमस्कार

'नवभारत'च्या ऑक्टोबर २०१२ मधील 'गीतारहस्याची पूर्वपीठिका' हा डॉ. श्री. मा. भावे ह्यांचा लेख विशेष आवडला. बेन्थॅम, मिल, स्पेन्सर इत्यादी पश्चिमी विचारकांच्या नीतिविचारांच्या तुलनेने गीतेतील नीतिविचार परिणत व प्रगल्भ असण्याच्या लोकमान्यांच्या प्रतिपादनावर त्यांनी नेमकेपणी बोट ठेवले आहे. तेव्हाच्या आंग्लशिक्षितांच्या मानसिकतेशी गीतारहस्याच्या निर्मितिप्रयोजनाचे असलेले आंतरिक नातेही त्यांनी उकलून दाखविले आहे, आणि विशेष म्हणजे गीता व गीतारहस्य ह्यांची आजही असलेली प्रस्तुतता (रेलेव्हन्स), उपादेयता, ग्राह्यता लेखाच्या अंती उत्तम प्रकारे विशद केली आहे.

भारतीय स्वातंत्र्यलढ्याच्या काळात तरुणांची मने पेटून उठविणारे प्रेरक ग्रंथ म्हणून गीता व गीतारहस्य ह्यांचे स्थान असाधारण होते. गीता हातात घेऊन तेव्हांचे क्रांतिकारक तरुण हसतमुखाने फाशीच्या तख्तावर चढले. शांत तळयात सूर्यबिंब स्वच्छ बिंबित व्हावे, तसे लोकमान्यांच्या जीवनदृष्टीचे सर्व पैलू त्यांच्या 'गीता रहस्यां'त स्पष्ट उमटले आहेत. लोकमान्यांची ती चित्कला आहे. ते त्यांचे आध्यात्मिक अंतश्चरित्र होय . त्यांची अस्मिता व त्यांची विभूती यांची ती वाङ्मयाची मूर्ती. त्यांच्या अकुतोभय जीवननिष्ठेवरील ते त्यांचे स्वतःचे भावोत्कट भाष्य होय. अंतर्यामी ते एक धर्मशील धर्मपुरुष होते. वज्रकठोर, निर्मोही, निग्रही, दुर्दम्य टिळक त्यांना जाणवलेल्या गीतातात्पर्याचे चालतेबोलते जिवंत रूप होते. त्या वेळी हिंदुस्थानात जणू एक प्रकारचे रणक्षेत्रच सजून गजबजून राहिलेले; त्यात सरकार व प्रजा ह्यांच्यात युद्ध सुरू; काळ इंग्रज सरकारला अनुकूल; विषाद व औदासीन्य वाढण्याची सर्व कारणे भारतीयांच्या बाजूला, या राजकीय युद्धात हिंदवी प्रजा कचरण्याचा संभव; अशा वेळी लोकांना त्यांचे खरे कर्तव्य कोणते व कशा बुद्धीने त्यांनी ते करावे, हे सांगणे आपले कालप्राप्त कर्तव्य असल्याचे 'गीतारहस्य' लिहिताना टिळकांना वाटणे स्वाभाविक होते. गीतेतील अर्जुनाच्या जागी स्वातंत्र्ययुद्ध सज्ज असे स्वकालीन देशबांधव त्यांनी पाहिले. त्यांनी सर्वच श्रीकृष्ण प्रमाण मानला व रणांगणात धैर्य गळालेल्या अर्जुनाला त्याने उपदेशिलेली गीता आमरणान्त आचरणीय मानली! कृष्णाने जे जे केले त्यामागे त्याचे मनोगत मानवजातीचे कल्याण व राष्ट्रीय अभ्युदय हेच होते. लोकहितासाठी तुझ्या ह्या कुलकलंक मुलाला व त्याच्या भावांना मी मारले, असे वयाच्या १८व्या वर्षी कंसाला मारल्यावर त्याच्या पित्याला कृष्णाने स्वच्छ सांगितले होते.'किन्तु लोकहितार्थाय.....सानुजो वितिपातितः'(हरिवंश, ३१.४८-४९) मानवजातीचे कल्याण व राष्ट्रीय अभ्युदय ह्याच टिळकांच्या राजकीय जीवनाच्याही मुख्य प्रेरणा

अनुक्रमणिका

होत्या. लोक हे त्यांचे आद्य दैवत होते. 'गीतारहस्या'च्या संस्कृत श्लोकात्मक अर्पणपत्रिकेत आपला तो ग्रंथराज 'श्रीशाय जनतात्मने' म्हणजे जनताजनार्दनाला त्यांनी अर्पण केला, तो याचसाठी! श्रीकृष्णांचेही दैवत लोक हेच. 'मी कर्मे केली नाहीत तर हे सर्व लोक नाश पावतील', 'उत्सीदेयुः इमे लोकाः न कुर्याम् कर्म चेत् अहम्' असे ते गीतेत स्पष्ट म्हणतात. टिळकांनी सर्वत्र प्रमाण मानलेल्या श्रीकृष्णांनी गुरुकुलाचाच काय, स्वतःच्या यदुकुलाचाही संहार घडवून आणला आणि दुर्जनांच्या नाशासाठी आपण अवतार घेतो, ही आपली प्रतिज्ञा खरी करून दाखविली! आपल्या लोकोद्धाराच्या कार्यात जे जे आड आले, त्यांना कृष्णाने बेलाशक कापून काढले. त्याचा आदर्श अहर्निश समोर ठेवणाऱ्या टिळकांना प्रिन्सिपॉल आगरकरांनी व गांधींचे गुरू असलेल्या नामदार गोखल्यांनी अमानुष म्हटले, ह्याचा विस्मय वाटण्याचे कारण नाही! १९०८साली इंग्रजांनी भरलेल्या टिळकांवरील राजद्रोहाच्या प्रसिद्ध खटल्याच्या वेळी त्यांची यातून सुटका व्हावी, म्हणून त्यांचे चाहते पुढचे पाकिस्तानचे जनक बॅ. महंमद अल्ली जिना यांनी युक्तिवादाची कोर्टातील बचावाची जी योजना, 'लाइन ऑफ डिफेन्स' ठरविली होती, ती टिळकांनी बाजूस ठेवली आणि आपला राजकीय ध्येयवाद व मूल्यविचार इंग्रजांना आणि आपल्या देशबांधवांना सांगता यावा यासाठी, जणू आपल्या राजकारणावरचे तात्त्विक भाष्य म्हणून, आठ दिवस, बचावाच्या दृष्टीने निरुपयोगी असे ओजस्वी भाषण न्यायासनापुढे केले (ज्याचा अंश शिलालेखस्वरूपात मुंबई हायकोर्टात सांप्रत लावलेला आहे) व परिणामी वयाची पन्नाशी उलटून गेल्यावर, शरीर मधुमेहाने पोखरले आहे हे माहीत असूनही शांत चित्ताने ते काळ्या पाण्यावर गेले! तेव्हा भारताचा भाग असलेला ब्रह्मदेश (आताचा म्यानमार) येथील मंडालेच्या तुरुंगात कलकत्तामार्गे त्यांना न्यावयाचे म्हणून, मुंबईहून कलकत्त्याला जाणाऱ्या रेल्वेमेल गाडीत, पोलिसांनी, बेड्या घातलेल्या टिळकांना आणून बसविले व गाडी सुटावयास थोडा वेळ होता, म्हणून ते चहापाण्यासाठी निघून गेले. थोड्या वेळाने गाडी सुटण्याच्या वेळी येथून पाहतात, तो टिळक डब्यात आपल्या जागेवर शांतपणे निश्चिंत मनाने गाढ झोपून गेलेले! गीतेतला भगवंताचा आवडता स्थितप्रज्ञ याहून वेगळा असतो काय?

मूळ इंग्रजीवरून केळकरांनी मराठीत दिलेली टिळकांनी जे दहा ग्रंथ लिहावयाचे योजिले होते, त्यांची यादी उपलब्ध आहे; ती अशी :- १. हिंदुधर्माचा इतिहास, वैदिक, श्रौत, उपनिषदे, इतिहासपुराणे, दर्शने, भक्ति, ऐतिहासिक काळापूर्वीचे इत्तर धर्म व उपसंहार. २. हिंदु राष्ट्रधर्मवृत्तांत व त्याच्या निरनिराळ्या अंगांचे विवेचन. ३. रामायण-महाभारत यांच्या पूर्वीचा हिंदुस्थानचा इतिहास. ४. शांकर अद्वैतदर्शन ५. प्रांतिक राज्यव्यवस्था ६. हिंदु लॉ किंवा हिंदु धर्मशास्त्र ७. इन्फिनेटेसिपल कॅल्क्युलस् ८. भगवद्‌गीतारहस्य ९. शिवाजींचे चरित्र १०. खाल्डिया व हिंदुस्थान. राजकीय विषयकयांतील ८ व्यास्थानावरचे 'गीतारहस्य' तेवढे लिहून झाले! तेही धकाधकीच्या व्यस्त राजकीय जीवनात इंग्रजांनी ६ वर्षे काळ्या पाण्याच्या तुरुंगात डांबून सक्तीची विश्रांती दिल्यामुळे! खाल्डियन व भारतीय वेद, सांडलेली सांख्यकारिका (ईश्वरकृष्णाच्या प्रसिद्ध सांख्यकारिका ग्रंथातील हरवलेली एक लुप्त कारिका मागचापुढचा संदर्भ पाहून त्यांनी बेमालूम रचून दिली!), वेदांगजोतिष इत्यादी त्यांचे निबंध व डॉ. के. पां. जोग ह्यांनी अलीकडे संपादित केलेला व्यासांच्या ब्रह्मसूत्रांवरील टिळकांचा संस्कृत टिपणग्रंथ (हाही मंडालेच्या तुरुंगात लिहिलेला!) इत्यादी त्यांच्या बहुआयामी विद्याव्रतित्वाची स्मारके प्रसिद्धच आहेत. वेळोवेळी ह्या राष्ट्राच्या अवनत दशेत त्या त्या काळच्या लोकाग्रणींना राष्ट्रीय उत्थानाच्या प्रेरणेची ऊर्जा गीतेने पुरविली. शंकर, रामानुज, मध्व, वल्लभ, निंबार्क ह्यांसारख्या मेधावी तत्त्वचिंतक धर्मधुरीणांपासून अलीकडच्या टिळक, गांधी, विनोबा, योगीअरविंद ह्यांसारख्या महामानवांपर्यंत








विभिन्न भारतीय भाषांमध्ये भगवद्गीतेविषयी शतकानुशतके निपजलेले ग्रंथ ह्याची साथ होत. माणसाच्या आंतरिक अतींद्रिय विश्वाची अतिउत्कट जिवंत जाणीव हीच गीतेची प्रेरक शक्ती. उपनिषदातली सर्वश्रेष्ठ ब्रह्मविद्या गीतेने अधिक लोकाभिमुख व सर्वजनसुलभ केली. अंतिम सत्याच्या साक्षात्काराचे उत्स्फूर्त उद्‌गार, जी उपनिषदे ती कोणा एका धर्माची, पंथाची, संप्रदायाची नसून वैश्विक आहेत. त्यांची सोपी, सुटसुटीत जनसामान्यसुलभ आवृत्ती म्हणजे गीता. योगदर्शनाची पूर्वपीठिका गीतेने रचली. भागवतधर्माचा तिने पाया घातला. देवर्षिनारदांची भक्तिसूत्रे भगवद्गीतेतील भक्तिविवेचनाला अनुसरतात. प्रसिद्ध विद्वान डॉ. पी. के. गोडे ह्यांनी हे दर्शविले आहेच. गीता महाभारतात मागाहून घातली, हे जर्मन संशोधक गार्बे ह्यांचे म्हणणे खरे नव्हे. महाभारताच्या दोन्ही अनुक्रमणिकांमध्ये निर्दिष्ट असलेली गीता, महाभारतात मुळापासूनच आहे. गीतेत ब्रह्मविद्या व योगशास्त्र हातात हात घालून चालतात. योगशास्त्र ही आत्मज्ञानमय जीवनाची कला होय, हे गीता दर्शविते. द्वैती सांख्यांचा अद्वैताशी केलेला सहज समन्वय हे गीतेतल्या ब्रह्मविद्येचे वैशिष्ट्य होय. आयुष्याची इतिकर्तव्यता कोणती, ती साध्य करण्यासाठी मूल्यांचे प्रामाण्य कसे पारखावयाचे, नीतीची बंधनकारकता नेमकी कशात आहे, माणसाच्या सामाजिकतेचा आधार कोणता ह्या आणि अशा कोणत्याही काळातील माणसाला पडू शकणाऱ्या तात्त्विक प्रश्नांची चोख उत्तरे गीता देते. जीवनाला नीतीचे, निःस्वार्थतेचे, आत्मश्रद्धेचे एवढे सुंदर वळण लावणारा असा दुसरा ग्रंथ नाही. एकूण मानवजातीच्या आजवरच्या अध्यात्मसंस्कृतीचा सर्वोत्तम सुगंध गीता होय. स्वाभाविक वासनांचे माणसांचे जग व त्यांची सामाजिक ध्येये एका बाजूस आणि आध्यात्मिक जीवनाची आकांक्षा व शिस्त दुसऱ्या बाजूस यांच्यात कायम विरोध असल्याचे गीता मानीत नाही. समाजाचे स्थैर्य व दृढ ऐक्य म्हणजे लोकसंग्रह हेच धर्माचे ध्येय असल्याचे ती सांगते. 'आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन। सुखंवा यदि वा दुःखं सयोगी परमो मतः।।' सर्वांविषयीची आत्मौपम्य दृष्टी म्हणजे साम्ययोग हे विनोबांच्या मते गीतेचे तात्पर्य. हे आत्मौपम्य हाच माणसाच्या सामाजिकतेचा आधार.स्वतःला सर्वांमध्ये आणि सर्वांना स्वतःमध्ये पाहण्याची वृत्ती म्हणजे आत्मौपम्य म्हणजेच अध्यात्म हे गीतेचे प्रतिपादन सर्वकाली सर्वांना सारखेच स्वीकारणीय होय.

तात्पर्य, विविध सजीवांमध्ये अनुस्यूत असलेली आध्यात्मिक एकता हाच नीतिमत्तेचा सयुक्तिक पाया होऊ शकतो, हे गीतेचे म्हणणे हा पश्चिमीनीतिविचारकांच्या प्रतिपादनाच्या तुलनेने शतपटीने ग्राह्य, प्रगल्भ व परिपूर्ण नीतिविचार असल्याचे लोकमान्यांचे प्रतिपादन नेमकेपणी डॉ. भाव्यांनी सादर केले. गीतारहस्यलेखकाचा तेव्हाच्या वैचारिक पर्यावरणाशी असलेला अंतःसंबंध साधार उलगडून दाखविला, ह्यासाठी डॉ. भाव्यांचे मनःपूर्वक अभिनंदन. गीतारहस्यानंतरचा मराठीतील दुसरा शतकग्रंथ 'आधुनिक भारत'. सुप्रसिद्ध गांधीवादी समाजवादी तत्त्वचिंतक आचार्य जावडेकर, हे त्याचे लेखक. 'गीतारहस्यानंतर मराठीत नाव घेण्याजोगा ग्रंथ हाच झाला', हे विख्यात समीक्षक प्रो. वामन मल्हार जोशी ह्यांचे उद्‌गार प्रसिद्धच आहेत. टिळकांच्या विचारधारेला आचार्य जावडेकरांनी 'आधुनिक भारत' व 'स्वाभिमानी राष्ट्रवाद' म्हटले तेही जाताजाता गीतारहस्यलेखनाच्या पार्श्वभूमीच्या संदर्भात संस्मरणीय आहे. डॉ. भाव्यांचे फिरूनं अभिनंदन करून येथे थांबतो.

आपला,

म. शं. वाबगावकर,
मुंबई.

# लेखकांचा परिचय

## रमेश रामचंद्र चव्हाण

युनायटेड वेस्टर्न बॅंकमधून निवृत्त महाव्यवस्थापक, वाईतोल [illegible] रा. ना. चव्हाण यांचे सुपुत्र, रा. ना. चव्हाण यांचे उपेक्षित वाङ्मय संपादन करून त्यांच्या लिखाणाची २३ पुस्तके प्रकाशित केली.

***पत्ता :–*** १३७८, रविवार पेठ, वाई.
भ्रमणध्वनी : ९८६०६०१९४४.

## प्रा. श्री. मा. भावे

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

***पत्ता :–*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४.
दूरध्वनी :- (०२०) २५६७४०९३.

## विश्वास दांडेकर

निवृत्त उच्चपदस्थ अधिकारी, आयुर्विमा महामंडळ; इतिहास, युद्धे व युद्धशास्त्र या विषयांमध्ये विशेष रूची व अभ्यास; वृत्तपत्रे व नियतकालिके यांमधून प्रासंगिक लेखन.

***पत्ता :–*** 'मालवती' १७ ब, कांगा कॉलनी, सदरबाजार, सातारा–४१५००१.
दूरध्वनी :- (०२१६२) २३५२५४.

## डॉ. अंकुश बालाजी सावंत

मुंबई विद्यापीठातील राज्यशास्त्रविभागातून निवृत्त प्राध्यापक, सध्या आंतरराष्ट्रीयसंबंधाविषयी अभ्यासासाठी संस्था चालवतात.

***पत्ता :–*** २०१, प्रियांका अपार्टमेंट, सेंट अँथनी स्ट्रीट, वाकुळा, सातांक्रुझ, ईस्ट मुंबई–४०००५५.
दूरध्वनी :- (०२२) २६६७०२१३

## डॉ. सुनंदा देशपांडे

नागपूर येथील एल. ए. डी महाविद्यालयामधून मराठीच्या निवृत्त प्राध्यापिका, 'रंगवेध' या नाट्यसमीक्षेच्या पुस्तकास महाराष्ट्र साहित्य परिषदेचा पुरस्कार.

***पत्ता :–*** ३९, नारळेभवन, टिळकनगर, नागपूर–४४००१०.
भ्रमणध्वनी : ९३७२४१९९००.

## श्री. बाबूराव चंदावार

समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक

***पत्ता :–*** सईनगर २, डी. १, फ्लॅट – १३, सिंहगडरोड, पुणे – ४११ ०३०.
दूरध्वनी : (०२०) २४२५०६९३.

अनुक्रमणिका






रजिस्टर क्र. 11697/57

# नवभारतास हार्दिक शुभेच्छा !

– पु.ना. गाडगीळ आणि कंपनी यांच्याकडून

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून मरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.



अनुक्रमणिका